प्रिय मित्र

शंकर बळवंत कुलकर्णी, बी. ए.

यांस सप्रेम समर्पण.

# अनुक्रमणिका




| | विषय | पृष्ठ |
|---|---|---|
| | माझें मनोगत | ५ |
| | कविवर्य तांबे यांचा आशीर्वाद | ६ |
| | प्रस्तावना | ९ |
| १ | हितगूज | ३५ |
| २ | बापाचें हृदय | ४५ |
| ३ | शुभ मङ्गल | ५१ |
| ४ | काव्यात्म जीवन | ५८ |
| ५ | कडाका | ६७ |
| ६ | शपथ | ७४ |
| ७ | शापवाणी | ८६ |
| ८ | प्रीतीसाठीं | ९३ |
| ९ | कसोटी | ९९ |
| १० | सुखस्मृति | १०४ |
| ११ | सहभावनेचें तारायन्त्र | ११५ |
| १२ | रुग्णालयांत | १२१ |
| १३ | स्वार्थत्याग | १३० |
| १४ | नवें जिणें | १३६ |
| | परिशिष्ट ( टीपा ) | १४७ |

# माझें मनोगत

प्रस्तुत काव्य म्हणजे शेतकरी-वर्गाच्या जीवनावर लिहिलेली एक संसार-कथा आहे. विद्यार्जनाच्या काळांत घरची शेतीभाती पाहण्याचा व त्याच सुमारास मुंबईतील गिरणी मजुरांची स्थिति अवलोकन करण्याचा जो योग जुळून आला, त्याच्या दर्शनांतून या संसारकथेचा जन्म झाला. व १३ जुलै १९२५ रोजीं पहिला 'बहार' लिहिला जाऊन, ८ फेब्रुवारी १९२८ रोजीं हें काव्य लिहून संपलें.

१९२८ मधें पुस्तकरूपानें हें काव्य प्रसिद्ध झाल्यावर माझ्या एक दोन टीकाकार मित्रांनी त्यावर आपली लेखणी स्वच्छंदपणें चालविली. त्यावेळीं 'ही टीका काव्यापेक्षां माझ्या प्रस्तावनेवर व व्यक्तिशः माझ्यावर आहे व तींत काव्याचें परीक्षण फार थोडें आहे,' ही माझी तक्रार होती. पण मी तिला उत्तर दिलें नाही. फक्त दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं दरम्यान मजकडे आलेले कै. कविवर्य भास्करराव तांबे यांचें पत्र मीं आरंभीं घातलें. आजची तिसरी आवृत्ति काढतांना काव्यपरीक्षणाच्या आड माझी प्रस्तावना येऊं नये, यासाठी ती मीं समग्र गाळून टाकली आहे व केवळ काव्यवस्तुच रसिकांपुढें ठेविली आहे.

मुंबई विद्यापीठानें व कर्वे विद्यापीठानें महाविद्यालयीन अभ्यासक्रमांत पूर्वीं व आतां या काव्याचा समावेश केल्याबद्दल या विद्यापीठांचा मी आभारी आहें.

माझ्या एका चिरंजीवानी या पुस्तकाचें संपादन करण्याची इच्छा दर्शविली व माझ्यावरील टीकांचा स्वेच्छेने परामर्ष घेऊन, काव्याबद्दल थोडें फार लिहिलें; माझे मित्र श्री. पंडितराव कुलकर्णी यांनी प्रकाशनाची जबाबदारी पत्करली; दोघेहि घरचेच असल्यानें आभार कसे मानावयाचे?

९ जून १९५१<br>विश्रामबाग, सांगली.

—गिरीश

# कविवर्य तांबे यांचा आशीर्वाद

फाळक्यांचें घर
कंपू लष्कर
गवालियर
ता. ४ डिसेंबर १९२८

कृ. सा. न. वि. वि.

...... आपल्या 'आम्रराई' पुस्तकासंबधाने माझा अभिप्राय आपल्यास हवा आहे. माझ्या अभिप्रायाची आपल्यास इतकी किंमत वाटावी हें माझ्या योग्यतेपेक्षां आपल्या अव्याज अंतःकरणाचेंच अधिक द्योतक आहे. .........

मीं आम्रराई काव्य अथपासून इतिपर्यंत काळजीपूर्वक वाचून पाहिलें. तें अत्यंत रसाळ उतरलें आहे. कोणीं कांहीहि म्हटलें तरी प्राच्य आणि पाश्चात्य लेखांचें मनन करून 'वाक्यं रसात्मकं काव्यम्' हेंच मला खरें वाटतें. ही व्याख्या प्रो......यांस अव्याप्त वाटते. याचें कारण एवढेंच कीं, 'रस' म्हणजे काय, या एका शब्दांत किती अर्थ भरला आहे याची माहिती त्यांस नसावी. अर्नोल्डचें 'Criticism of Life' किंवा 'Application of Moral Ideas' इत्यादि लक्षणें मला अपुरीं वाटतात आणि एकांगी वाटतात. 'रस' ह्या शब्दांत त्यांचा अंतर्भाव होतो. इतकेंच नव्हे तर त्याची व्याप्ती इतकी विस्तृत आहे कीं, तींत हीं लक्षणें सांधिकोपऱ्यांत दडून पडतील. काव्य 'Criticism of life' इत्यादि तर आहेच, पण वर्डस्वर्थचें 'Light that never was on sea and land' किंवा कीट्सचें 'Unheard Melodies' हें देखील आहे. आणि रस (अलौकिकः आनन्दः) यांत या सर्व गोष्टींचा समावेश होतो. या दृष्टीने मीं आपल्या काव्याचें अवलोकन केलें, आणि आपणांस लिहितांना मला मोठा आनंद वाटतो तो हा कीं, ह्या दिव्य कसोटीला आपलें काव्य चांगलें उतरलें

आहे. जिकडे तिकडे रसपरिपोष चांगला झाला आहे. भाषा सरळ, साधी, विषयानुकूल आणि प्रसादपूर्ण आहे. इतकें म्हटल्याने आपलें कदाचित समाधान होणार नाही, 'अनामिका सार्थवती बभूव' अशा स्तोतारवाला आपण भुलणारे नाही हें मी जाणून आहें. दोषस्थळें आपणांस दाखवावीं अशी आपली अपेक्षा असणें संभवनीय आहे. ह्या दृष्टीने मीं आपलें काव्य पुन्हा वाचून पाहिलें. पण, काव्यानन्दापुढें चिकित्साबुद्धीचा टिकाव लागेना. चिकित्सेसाठी जी काकदृष्टि पाहिजे ती जागीच झाली नाही. मला वाटतें आपल्या काव्याचें महत्त्व याच गोष्टींत आहे. खऱ्या कवितेपुढें 'प्रयुक्तमप्यस्त्रमितो वृथास्यात् ' असें टीकास्त्र बोथाटतें, तसेंच आपल्या काव्याच्या वाचनाच्या वेळीं माझें झालें. खरें म्हटलें, तर मला विशेष दोषस्थळें दिसलींच नाहीत. कोठें एखादा शब्द खुपला असेल, इतकेंच काय तें. ग्राम्य भाषेंत अभिजात भाषेला शोभणारा एकादा शब्द इतस्ततः पडला असेल, पण काव्याच्या प्रवाहांत या बारीकसारीक केरकचऱ्याकडे कोण पाहातो ? मधें मधें घातलेलीं गीतें तेजोमय आकाशगंगेंत झळकणाऱ्या ठळक नक्षत्रासारखीं मोहक वाटतात. तीं फार मधुर आहेत. 'न्यारिचा वकुत होईल', ' तुझ्या नांवाची गोडी लइ जिवा ', 'पिरतिची किरत' इत्यादि इत्यादि सारींच गाणीं बहारदार आहेत. नाकच मुरडायचें असा निश्चय केल्यास म्हणतां येईल कीं, 'पैसा' आणि 'दारूची लावणी' हीं असावीं तशीं नाहींत. तीं भोळसट जनपदवधूसारखीं वाटतात. पौरवधूचा नोकझोक त्यांत कमी आहे. तीं उपरोधिक, हास्यरसोत्पादक, विडंबनगीतांसारखीं—ज्यांस इंग्रजींत 'ग्रोटेस्क' म्हणतात—तशीं असतीं तर ज्यास्ती खुमारी आली असती. पण असलीं बोटें दाखविण्यांत कांही हंशील नाही. ही गोष्ट कवीच्या तत्कालिक मनस्थितीवरच अवलंबून असावयाची.

ज्याची दृष्टि संसृतींत वावरत असतां केवळ स्फूर्तिबलाने भरारी मारून जो इहलोकचा नव्हे, त्या अलौकिक आनंदांत लीन होते, तोच खरा

'रसिद्ध' कवि होय. त्याचा सहवास सुखदायक वाटतो. तो देवाचा लाडका असतो. गिरीश, तुम्ही या मानाला पात्र आहांत, हें सांगतांना मला जो आनंद होत आहे, तो मीच जाणतों.

एक वेळ मला असेंहि वाटतें कीं, आपल्या काव्यांतील पात्रांचा स्वभावपरिपोष, त्याची रसवत्ता, सृष्टिवर्णनाची हातोटी, त्यांतील संदेश इत्यादि इत्यादि मुद्यांचा विचार करून गुणदोषविवेचनपूर्वक समालोचन करावें. पण हे दिवस थंडीचे. खोकल्याच्या माऱ्याने ह्या दिवसांत माझ्या शरीराच्या चिंध्या चिंध्या होतात. त्यांत कामाचा बोजा या दिवसांत अधिक. अशा स्थितींत कोणताहि संकल्प करावयास मन घेत नाही. पण कदाचित सरकारी कार्यानिमित्त महिना दोन महिन्यात माझें येणें पुण्याकडे होईल. तेव्हां आपण मनसोक्त याची चर्चा करूं. आपल्या पद्धतींत जे गुणदोष मला दिसतात, ते आपल्या नजरेस आणतां येतील व त्याबद्दल विचारविनिमय करितां येईल. पण हें जुळूनच येईल, असें नक्की कोणीं सांगावें ? तूर्त तर, एकंदरींत आपलें काव्य मला फार आवडलें ह्या एका वाक्यांत काय तें समजावें......कळावें.

आपला,

—भास्करराव तांबे.

# प्रस्तावना

वडिलांच्या ग्रंथाला मुलानें प्रस्तावना लिहिण्याची परंपरा मराठी साहित्यांत आहे किंवा नाहीं तें मला माहित नाहीं. पण आम्बराईच्या संपादनाचें काम स्वीकारतांना त्यांतील नाजूक औचित्य आणि अवघड जबाबदारी याची मला विशेष जाणीव होत आहे. विशेषतः 'रविकिरण-मंडळांतील' कवींच्या उथळ उपहासाच्या शिदोरीवर, टीकेच्या क्षेत्रांत कोणालाहि मार्मिकतेची आणि आधुनिकतेचीं बिरुदें सुलभतेनें मिळण्याची शक्यता असलेल्या या काळांत, तर हा अव्यापारेषु व्यापार ठरण्याचाच संभव अधिक आहे. परंतु आधुनिकतेची ऐतिहासिक दृष्टिकोनाशीं, आणि मार्मिकतेची रसिकतेशीं, ज्या काळांत फारकत होऊं लागते, त्याच काळांत अशा प्रयत्नाची आवश्यकताहि निर्माण होते.

१९४३ सालीं मी बी. ए. चा अभ्यास करीत असतांना त्या वेळच्या क्रमिक पुस्तकांत गिरीशांच्या आम्बराईचा अन्तर्भाव करण्यांत आलेला होता. त्या निमित्तानें त्यावेळीं या काव्याचा आणि त्यावरील विविध टीकाभाष्यांचा अभ्यास करीत असतानाच, एका वस्तुस्थितीची मला स्पष्ट जाणीव झाली होती. रसिक मनावर या काव्याचे होणारे परिणाम आणि लहान मोठ्या टीकाकारांनीं वेळोवेळीं परीक्षणाच्या निमित्तानें व्यक्त केलेले निष्कर्ष, यांत अनेक ठिकाणीं दोन ध्रुवांइतकें अंतर पडलें होतें. टीकाकारांच्या वरकरणी चमकदार भासणाऱ्या भाष्यांत ऐतिहासिक दृष्टि-कोनाचा अभाव, उथळ ताशेरे झाडण्याची वृत्ति, स्वतःच्या पांडित्य-प्रद-र्शनाची हौस, पूर्वग्रह इत्यादि अनेक वैगुण्यें सुप्त रूपानें दडलेलीं मला आढळलीं. प्रत्येक कृतीच्या जन्मकाळीं वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेलीं परीक्षणें, पुष्कळशीं मामुली, उथळ आणि व्यक्तिगत संबंधावर आधार-

लेलीं असतात, म्हणून घटकाभर सोडून दिलीं, तरी दोन तपांचा काल उलटल्यानंतर महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठीं अशा काव्याची चिकित्सा करणाऱ्या सहृदय आणि प्रथमश्रेणीच्या टीकाकारांनींहि त्यांचाच कित्ता गिरवावा याचें नवल वाटतें. ज्यांची रसिकता आणि चिकित्सकता अजून अप्रगल्भ आणि संस्कारक्षम अवस्थेंत आहे, अशा विद्यार्थ्यांचा बुद्धिभेद न करतां, अशा कृतींतील वैशिष्ट्यांची आणि वैगुण्यांची, रसिक आणि ऐतिहासिक दृष्टिकोनांतून मीमांसा होणें म्हणूनच आवश्यक वाटतें. काव्याच्या इतिहासांत दोन तपावर आपलें भलेंबुरें स्थान टिकविलेल्या ' आम्बराई ' या काव्याची एका स्वतंत्र दृष्टिकोनांतून चिकित्सा व्हावी आणि शक्य तर खण्डकाव्यांच्या परिसरांत या काव्याचें स्थान निश्चित करावें या हेतूनेंच मी प्रस्तावनेचा प्रपंच करीत आहें.

## खण्डकाव्य

' आम्बराई ' हें गिरीशांचें तिसरें खण्डकाव्य,त्यांनीं १९२५ मधें लिहा-वयास घेतलें आणि १९२८ मधें ' रविकिरणमंडळाचें ' १२ वें प्रकाशन म्हणून प्रसिद्ध केलें. तोंपर्यंत आधुनिक मराठी काव्याची हयात चाळीस वर्षांवर होऊन गेली होती आणि खुद्द ' रविकिरणमंडळाची ' स्थापना होऊन पांचसहा वर्षें झालीं होतीं. त्यामुळेंच प्रस्तुत काव्यावर अर्वाचीन कवींपैकीं गोविंदाग्रज, बालकवि इत्यादि कवींचे जसे अभावित संस्कार झालेले दिसतात, तसेंच ' रविकिरणमंडळानें' घडविलेल्या आणि विकसित केलेल्या अभिरुचीचेहि संस्कार उमटलेले दिसतात. ' खण्डकाव्य ' या शब्दाचा, प्राचीन काळांत ' मेघदूता ' सारख्या काव्याच्या अनुरोधानें कोणत्याहि अर्थीं वापर झालेला असो; अर्वाचीन काळांत आधुनिक कवींच्या प्रदीर्घ काव्याला, विशेषतः कथाकाव्याला उद्देशून या शब्दाचा उपयोग करण्याचा संकेत पडलेला आहे. कथाकाव्याची परंपरा मराठींत सर्वस्वीं नवीन आहे असें नाहीं. रघुनाथ पंडित, श्रीधरासारखे जुने

आख्यानकवि आणि त्यांचें काव्य, वृत्ति आणि हेतु वजा करतां, खण्ड-काव्याच्या परंपरेंतच समाविष्ट होतात. नवीन स्फुट कवितेनें पांडित्य, कारागिरी आणि भक्ति ह्या जुन्या काव्याच्या हेतूंची तटबंदी फोडून, विविध सामाजिक विषयांच्या साह्यानें नवरसाचे मळे फुलविले; तोच प्रकार खण्डकाव्यांतहि झालेला दिसून येतो. पेशवाईनंतर इ. स. १८८५ पर्यंत खण्डकाव्याचा इतिहास ओझरता पाहिला तरी त्यांत, ' चिपळूणकर-मेघदूत', ' बजाबा रा. प्रधान-देवसेनी,' ' किर्तीकर-इंदिरा', यांसारखीं संस्कृत-इंग्रजीचीं भाषांतरें, तर ' कुंटे—राजा शिवाजी ' ' चिन्तामणी-पेठकर—गंगावर्णना, ' यांसारखीं स्वतंत्र खण्डकाव्यें दृष्टीला पडतात. आरंभींच्या या प्रयत्नांचें महत्त्व काव्यदृष्टीपेक्षां, त्यांनीं निर्माण केलेलें स्फुरण, एवढ्याच पुरतें मर्यादित आहे. इ. स. १८८५ नंतर मात्र स्फुट काव्याप्रमाणें खंडकाव्यांतहि विषयांची विविधता, निरू-पणांतील शैलीची नवीनता, दृष्टीकोनाची सूक्ष्मता, रसांची उत्कटता इत्यादि अनेक गुण व्यक्त झालेले दिसतात. 'रविकिरणमंडळाच्या' काळाला १९२३ पासून आरंभ होतो असें मानलें, तर यापूर्वीच्या काळांत स्थूल-मानानें, ' लेंभे-शोकावर्त', ' कानिटकर-संमोहलहरी', ' रे. टिळक-वन-वासी फूल', ' चंद्रशेखर-काय हो चमत्कार ! ',' विनायक-ध्यास तो भास ' ' गणिकोद्धार ',' बी-कमळा',' सावरकर-कमला, गोमांतक', ' अनंततनय-अंतर्विद्धकलिका', ' रेंदाळकर-मोहिनी ' आणि ' बालकवि गोविंदाग्रजांचीं अपुरीं खण्डकाव्यें ' इत्यादि, विविध प्रयोगांची आणि प्रयत्नांची कल्पना आणून देणारी, नामावळी दृष्टीला पडते. शेतकरीजीवनावर आधारलेल्या खण्डकाव्याचा शोध घेऊं जातां या यादींत फक्त ' काय हो चमत्कार ! ' हें चंद्रशेखरांचें एकच खंडकाव्य आढळतें. परंतु याहि काव्याचा भर वस्तुस्थितिनिदर्शनापेक्षां अद्‌भुतरम्य कथानिवेदनावर प्रामुख्यानें अस-ल्यानें, आणि स्वतः चंद्रशेखर वृत्तीनें जुन्या पंडितपरंपरेशीं समरस

होणारे असल्यानें, या काव्याची जडणघडण नवीन काव्यदृष्टीपेक्षां जुन्या काव्यदृष्टीशीं जुळणारी व्हावी, हें स्वाभाविक आहे. या काव्याचें एकुलतें एक उदाहरण सोडलें, तर जानपद जीवनावरील खण्डकाव्यासाठीं गिरीशांच्या 'आम्बराई 'कडेच वळावें लागतें. काव्याविषयीं नवी अभिरुचि, नव्या कल्पना आणि नवे हट्ट घेऊन जानपद जीवनावर प्रदीर्घ कथाकाव्यरचनेचा 'आम्बराई' हा पहिला प्रयोग आहे, ही ऐतिहासिक वस्तुस्थिति काव्यचिकित्सेंत डोळयाआड होऊं नये, यासाठीं हा सबंध इतिहास साक्षेपानें उभा करावा लागला आहे. ही काव्यमीमांसा अधिक सुस्पष्ट होण्यासाठीं इतिहास--अवलोकनाप्रमाणेंच प्रस्तुत काव्य लिहिणाऱ्या कवींच्या काव्यशक्तीची चिकित्सा होणें जरूर आहे.

## गिरीशांची काव्यशक्ति

सफाईदार रचना आणि संयत भावना हे गिरीशांच्या काव्यशक्तीचे दोन विशेष म्हणून टीकाकारांनीं नमूद केले आहेत. बालकवि, गोविंदाग्रज आणि तांबे यांचे गिरीशांच्या शैलीवर संस्कार होऊनहि, तिनें स्वतःचें वेगळें वैशिष्ट्य कायम ठेवलें आहे, याहि गोष्टीचा टीकाकारांनीं उल्लेख केला आहे. 'रविकिरणमंडळांतील' इतर कवींच्या तुलनेनें गिरीशांचें आधिक्य या बाबतींत आहे, असें प्रा. रा. श्री. जोग म्हणतात. इतर टीकाकार याच विशेषांकडे वैगुण्य म्हणून बोट दाखवितात. यशवंतांचा कल्पनाविलास आणि माधव जूलियनांची भावनोत्कट ध्येयशीलता गिरीशांच्या मनःपिंडाच्या चौकटींत बसूं शकत नाहींत. परंतु हा अभाव वृत्तीच्या आणखी कांहीं विशेषांनीं भरून काढला नसता, तर त्यांचें काव्य सामान्यांच्या सदरांतून थोडेंहि वर येऊं शकलें नसतें.

तसें पाहिलें तर चंद्रशेखरांच्या काव्यांतहि रेखीव रचना आणि संयमित भावना हेच दोन विशेष आढळून येतात. परंतु चंद्रशेखरांच्या काव्यां-

तील भावनेच्या संयमाचें कारण, त्यांची भावशीलता जरा अल्पतृप्त असलेली दिसते, हें आहे. गिरीशांच्या काव्यांतील भावना संयमित दिसते याचें कारण त्यांच्या भावशीलतेंत वृत्तींचा खंबीर कणखरपणा आहे. याच कणखरपणामुळें, ते भावविवश होऊं शकत नाहींत; निराशेच्या सहसा आधीन होत नाहींत; रसोत्कट प्रसंग रंगवितांनाहि तटस्थ असल्यासारखे भासतात, कल्पनाचमत्कृतींचें इंद्रधनुष्य ते उभें करूं शकत नाहींत वा अलंकारिक रचनेपेक्षां स्वभावोक्तीकडे त्यांचा ओढा अधिक दिसून येतो. गिरीशांच्या काव्यांतील टीकाकारांनीं नमूद केलेला आशावाद, सखोल चिंतनांतून निर्माण झालेला नसून, या कणखर वृत्तींतून उचंबळलेला आहे असें मला वाटतें. अनुभूतींच्या मर्यादित क्षेत्रांतहि आशावादी वृत्ति निराशेला आणि कुरूपतेला वळसे घालून जात नाहीं, तर या कणखरपणामुळेंच तिचा भेद करून जाते. त्यामुळेंच 'कृतज्ञते'-सारख्या कांहीं स्फुट काव्यांत आणि इतर कथाकाव्यांतील कांहीं प्रसंगांच्या भेदक चित्रणांत भावविवशतेपेक्षां हा कणखरपणाच त्यांना अधिक उपकारक झालेला आहे.

वृत्तींच्या या कणखरपणापेक्षांहि गिरीशांच्या कवितेला नाट्यमयतेचें वरदान अधिक उपकारक झालेलें आहे. गिरीशांच्या स्फुट कवितेंतील नाट्यगीतांची विपुलता या दृष्टीनें वैशिष्ट्यपूर्ण आहे. कै. तांबे यांचे गिरीशांच्या काव्यशक्तीवरील संस्कार या दृष्टीनें उल्लेखनीय आहेत. या नाट्यदृष्टीचा खरा आविष्कार त्यांच्या खण्डकाव्यांतून आणि कथाकाव्यांतून प्रकर्षानें दृष्टीला पडतो, यांत शंका नाहीं. 'आम्बराई' काय किंवा 'अभागी कमल' काय, या काव्यांतील कथारचना विशेष बंदिस्त नसूनहि त्यांत जी सरसता निर्माण झाली आहे, ती पुष्कळशी घटना, प्रसंग, स्वभावरेखाटन आणि संवाद यांतील नाट्यगुणामुळेंच आहे.

या नाट्यमयतेमध्यें बालकवि–गोविंदाग्रजांकडून संस्कारानें आलेली कल्पनारम्यता आणि किंचित फाजील चिंतनशीलता यांचें एक विचित्र मिश्रण गिरीशांच्या काव्यशक्तींत झालेलें आढळतें. रम्य, कुरूप आणि वास्तव वर्णनें करतांना ही कल्पनारम्यता जशी वेधक आणि भेदक रूप धारण करते, तशीच त्यांची चिंतनशीलता वेळीं अवेळीं उपदेश आणि तत्त्वज्ञान या रूपानें प्रगट होऊन रसभंगासहि कारणीभूत होते. या चिंतनशीलतेंत फारशी सखोलता आणि चिकित्सकता नसल्यानें परिणामीं तिला रुक्ष वा उथळ प्रवचनाचें किंवा मामुली उपदेशाचें स्वरूप प्राप्त होतें. पण हें वैगुण्य एकट्या गिरीशांचेंच आहे असें नाहीं. प्रत्येक काव्यावर विशिष्ट सामाजिक हेतु लादतांना, काव्यविषयांचें गुंतागुतीचें स्वरूप आणि त्यांच्या सूक्ष्म कठोर विश्लेषणासाठीं शास्त्रीय दृष्टिकोनाची आवश्यकता, यांची ‘ रविकिरणमंडळांतील ’ कोणत्याहि कवीनें कधींच दरकार बाळगली नव्हती. त्यामुळें हेतुदृष्ट्या अशा काव्यांत टीकाकारांना उथळपणा दिसावा, आणि त्यावर त्यांनीं तुटून पडावें, हें एका अर्थीं स्वाभाविकच वाटतें. परंतु कवींनीं आपल्या काव्यावर लादलेल्या हेतूंचा परामर्ष घेऊनहि, कलाकृतीचें मूल्यमापन तिच्या अन्तरंगावरून केलें पाहिजे, याचा विधिनिषेध टीकाकारांनींहि फारसा बाळगलेला दिसत नाहीं. ‘ रविकिरणमंडळातील ’ इतर कवींपेक्षां गिरीशांच्या वृत्तींतला तत्त्वज्ञ आणि उपदेशक अधिक प्रमाणांत जागृत असतो; त्यामुळेंच त्यांच्या काव्याला मर्यादाहि अधिक पडल्या आहेत.

या विशेषाप्रमाणेंच आणखी एका बाबीचा उल्लेख होणें जरूर आहे. गिरीशांनीं ग्रामीण जिवनांतील सुखदुःखें आणि बारकावे जवळून न्याहाळले आहेत आणि आत्मसात् केले आहेत. त्यामुळें पांढरपेशांच्या भावनेपेक्षां या क्षेत्रांत त्यांची काव्यशक्ति अधिक विलास दर्शविते. त्यांच्या स्फुट काव्यांतहि ‘ भलेरी ’ सारखीं जानपद गीतेंच विशेष लोकप्रिय आहेत, ही गोष्ट

लक्षांत घेण्यासारखी आहे. अर्थात् याहि विशेषाकडे ऐतिहासिक दृष्टिकोनांतूनच पाहिलें पाहिजे. नव्या काव्यांतील माडगूळकरबंधूंच्या लेखनांतील सामाजिक दृष्टिकोनापेक्षां गिरीशांच्या काव्यांत सासारिक दृष्टिकानच अधिक दिसून येतो. त्यांची काव्यदृष्टि सांसारिक सुखदु:खांतील कल्पनारम्यता ओलांडून फारशी पुढे गेलेली दिसत नाहीं.

'आम्बराईचें' अन्तरंग उकलून पाहिलें असतां याच वैशिष्टयांची आणि वैगुण्यांची प्रचिति येते.

## आम्बराईचें अन्तरङ्ग

'आम्बराई'बद्दल स्वतः कवि आपल्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत म्हणतात–"···प्रस्तुत काव्य म्हणजे शेतकरीवर्गाच्या स्थितीवर लिहिलेली एक संसारकथा आहे. कांहीं घरगुती अडचणींमुळें मला आपलें विद्यार्जन सोडून कांहीं काळ घरची शेतीभाती पाहावी लागली. त्यावेळीं हरघडी शेतकरी लोकांबरोबर वागावें लागल्यामुळें त्यांच्या स्थितीचें एकादें चित्र रेखाटावें, ही कल्पना मनांत आली. याच सुमारास मुंबईतलि गिरणीमजुरांची स्थिति अवलोकन करण्याचा योग जुळून आला. माझ्या मनांत या संसारकथेचें कथानक घोळूं लागलें. लगेंच मीं १३ जुलै १९२५ रोजीं पहिला 'बहार' लिहिण्यास घेतला. पुढें थोडें थोडें लिहीत जात जात ता. ६ फेब्रुवारी १९२८ रोजीं हें काव्य मीं लिहून संपविलें. ···"

या परिच्छेदात आलेला 'संसारकथा' हा शब्द महत्त्वाचा आहे. कारण कवीनें अन्यत्र शेती आणि शेतकरी यांच्या अधोगतीबद्दल मीमांसा करण्याचा विस्तारपूर्वक प्रपंच केला असला, आणि "···शेवटीं नायिकेच्या पदरांत तिच्या निर्मळ एकनिष्ठेच्या पुण्याईचें फळ टाकण्याबरोबरच शेतीच्या पुनरुज्जीवनाचाहि हेतु साधण्याचा प्रयत्न···"केला असला, तरी प्रा. रा. श्री. जोग म्हणतात, त्याप्रमाणें प्रामुख्यानें ही कथा···' अवेळीं

संपत्ति आणि स्वातंत्र्य हातीं आल्यामुळें एका उमद्या तरुण शेतकऱ्याचा अधःपात कसा होतो व परिस्थितीच्या तडाक्यानें पश्चात्ताप होऊन तो पुन्हा शेतीकडे कसा वळतो···' या संबंधींच आहे, यांत शंका नाहीं. हीं मर्यादा आंखून घेतानांच आणखी एका वस्तुस्थितीचा उल्लेख होणें आवश्यक आहे. तारुण्यांतील ज्या पहिल्या अवस्थेंत स्वप्नाळू प्रीतीचें भक्तिभावनेंत रूपांतर होतें आणि उमद्या स्वभावाला स्वाभाविक असलेल्या ज्या उन्मादक उच्छृंखळ आणि बेबंद वृत्तींशीं तिचा संघर्ष घडतो, त्या मनाच्या एका अवस्थेचें चित्र नायकाच्या रूपानें या काव्यांत चित्रित करण्यांत आलेलें आहे. त्यामुळेंच ही कथा जितकी शेतकरीजीवनाबद्दल आहे, तितकीच ग्रामीण जीवनांत संभवणाऱ्या एका विशिष्ट मनोवृत्तीबद्दल आणि एका मनोवस्थेबद्दलहि आहे, याचा आवर्जून उल्लेख व्हावयास हवा.

कृष्णाकांठच्या प्रदेशांत 'कमण्डलू' ओढ्याच्या कांठीं बसलेल्या अभेरीच्या पाटलांचा तरुण मुलगा मुरार, या मनोवृत्तीचें आणि या मनोवस्थेचें प्रतीक आहे. या मनोवस्थेचें वर्णन करतांना कवि म्हणतात–

" संसाराच्या झळा लागल्या नव्हत्या अजुनी त्याला,
अलग राहिला कोमल गाभा नाजुक केळीमधला. "

अशा अवस्थेंतल्या मुरारची वृत्ति प्रणयांत काय, अगर स्वैरतेंत काय बेछूट उन्मादाची आहे. ' वडीलधाऱ्या माणसांच्या मृत्यूनें हातीं आलेली संपत्ति आणि स्वातंत्र्य; त्या भोंवतीं सहजतेनें···'कणसावरती चढूं लागली भोंवतालची कीड', अशी जमत गेलेली कुसंगति; त्याबरोबर प्रवाहपतिता-प्रमाणें वाहत गेलेलें विलासी पण बेजबाबदार जीवित; सगुणेसारख्या सात्त्विक आणि प्रेमळ पत्नीबद्दलची भक्ति; तिचें जीवित सुखी करण्याची उत्सुकता आणि ईर्षा; कठोर पण परिणामीं मृदु परिस्थितीचे तडाखे; शारीरिक आणि मानसिक हालअपेष्टांच्या रूपानें झालेली आत्मशुद्धि

आणि वास्तव जगाची ओळख; आणि या संघर्षांतून जीवनधारणा करणाऱ्या कणखर मनोवृत्तींचा उगम '— या गोष्टी मुरारच्या जीवनाचाच नव्हे, तर कथावस्तूचा गाभा म्हणून तपासल्या पाहिजेत. हा गाभा चित्रित करतांना, गिरीशांनीं केलेली कथारचना कादंबरीच्या मापानें मोजल्यास कदाचित आकर्षक वाटणार नाहीं; परंतु कथानिरूपणांत, काव्याच्या दृष्टीनें येणारी मर्यादा लक्षांत घेऊन, कवीनें निवेदन आणि नाट्य यांची जी कौशल्यानें योजना केली आहे, तिचें स्वरूप रसिकांच्या मनावर ठसल्याखेरीज राहात नाही.

दैवदुर्विलासानें ही कथा शोकान्त व्हावी, असें या कथेंत दैवशक्तीनें उग्र-भीषण स्वरूप धारण केलें नाहीं, ही गोष्ट खरी; परंतु दैवाला आव्हान देण्याइतपत मुरारची मनोवस्था उत्कट आणि एकारलेली नाहीं, या वस्तुस्थितीचीहि नोंद अवश्य केली पाहिजे. प्रस्तुत काव्याची गडकऱ्यांच्या 'एकच प्याल्याशीं' अनेक वेळां वरवर दिसणाऱ्या साम्यावर तुलना केली जाते, म्हणून ही मीमांसा अपरिहार्य आहे. 'एकच प्याल्यांतील' सुधाकराची उत्कट, एकांतिक पोलादी वृत्ति, मुरारच्या ठायीं संभवतच नाहीं. त्यामुळें मूलतः सुधाकराचा आणि मुरारचा संघर्ष वेगळ्या जातीचा आहे. सुधाकर हें एका मनोवृत्तीचें चित्र आहे; मुरार हें एका मनोवस्थेचें चित्र आहे. त्यामुळेंच ही मनोवस्था ओलांडतांच सगुणेची प्रीति आणि शिलोजीच्या रूपानें अवतीर्ण होणारी प्रस्तुत काव्यांतली दैवाची सोज्वल शक्ति हीं काव्याच्या अखेरीस मुरारवर प्रभुत्व मिळवतात, आणि म्हणूनच काव्याचा शेवट सुखान्त होतो.

' आम्बराईतील ' मुरार आणि सगुणा या दोघांच्या संसारकथेचें चित्रण या दृष्टीनें तपासणें अत्यंत मनोरंजक आहे. 'आम्बराईच्या' पहिल्या तीन बहारांत मुरार आणि सगुणा यांच्या मुग्ध प्रणयाचें चित्रण मनोज्ञ

असून त्याचा शेवट उभयतांच्या विवाहांत होतो. या प्रणयाचे धागेदोरे त्यांच्या बालपणापर्यंत पोंचलेले दिसतात. मुरार आणि सगुणा, हे बालपणाचे संवगडी म्हणून ओढ्याकांठीं खेळत असतां—

" कधीं खेळांतिल पदार्थ तिचे मुरार खाई सारे,
सगुणेवरती रुसून जाई केंव्हां भरतां वारें.
तिनें उपाशी लटूपटीच्या राहावें संसारीं,
समजावुन मग तिनें गड्याला आणावें माघारीं... "

या बालपणांतील संवगड्यांच्या निर्मळ मैत्रीचें पुढें स्वाभाविक मुग्ध प्रणयांत रूपांतर होतें. ' आम्रराईच्या ' आरंभालाच या मुग्ध प्रणयाचें दर्शन घडविण्यासाठीं गिरीशांनीं योजलेला प्रसंग, ग्रामीण जीवनाच्या दृष्टीनें जितका वास्तव, कल्पनारम्य तितकाच नाट्यपूर्ण वाटतो. ओढ्याकांठीं पाणी भरण्यांत रमलेल्या सगूला भिवविण्यासाठीं मुरार डगरीवरून पाण्यांत ढेकूळ फेकतो; आणि भेदरलेली सगुणा '···कोन हाय तें, कोन हाय तें ! ' असें ओरडूं लागते, तोंच बाजूनें धावत आलेल्या खिलारजोडीवरून तिला मुरारची ओळख पटते; आणि मुरारला ती कृत्रिम कोपानें म्हणते—

" किति पन् भ्यालें मुरार, असली थट्टा लइ वंगाळ !"

प्रेमिकांचें मनोगत व्यक्त करतांना गिरीश या नाट्यपूर्ण प्रसंगांतून एकदम निरूपणाकडे वळतात आणि—

" भावनेंतली भाषा जों जों ओठावरती थांबे;
मुकीं होऊनी तोण्डें, भाषण डोळ्यांचें तों लाम्बे"

असें मनोज्ञ वर्णन करतात. नाट्य आणि निरूपण यांचा उपयोग करतांना गिरीशांनीं ज्या तंत्राचा अवलंब केला आहे, त्याचें स्वरूप न्याहाळतां खण्डकाव्यांतल्या या कथानकाची जातच इतर प्रकारांतील

कथानकाहून वेगळी असते असा प्रत्यय येतो. गिरीशांच्या पुरतेंच बोलावयाचें, तर नाट्यमयप्रसंग आणि विविध प्रकारचीं वर्णनें, याना कथानकांत जेथें जेथें म्हणून उठाव मिळेल तेथें तेथें त्यांची काव्यशक्ति स्थिरावते; आणि मधले दुवे निवेदनाच्या धोपट मार्गानें ते भरून काढतात. कथेंतील दुवे साधण्यासाठींच निर्माण झालेला हा निवेदनमार्ग पुष्कळसा अकाव्यात्मक उतरला तर तो दोष कवीचा नसून काव्यप्रकाराचा मानला पाहिजे. विशेषतः वृत्त-जातिमध्यें खण्डकाव्य लिहिणाऱ्या कवींच्या बाबतींत तर हा प्रमाद अटळ आहे. खण्डकाव्याची रचना करण्यासाठीं नवीन कवींनीं 'मुक्तछंदाचा' आश्रय केला तरच या वैगुण्यावर त्यांना मात करतां येणें शक्य होईल.

मुरार आणि सगुणा यांच्या विवाहानंतरचा दोन वर्षांचा काळ-प्रीतीच्या पहिल्या उन्मादांत झरकन् कसा जातो तें कळत नाहीं. याच काळांत मुरारच्या बेछुट वृत्तींना आईबापांच्या आंधळ्या मायेमुळें स्वैर वाव मिळतो. 'मित्रसंगतीं चूर' होऊन तो 'स्वच्छंदानें चैन' करूं लागतो, कधीं ब्रह्मपुरीच्या जत्रेला तर कधीं पालीच्या जत्रेला, कोठें शाहीरांच्या तमाशांत तर कोठें कुस्त्यांच्या फडांत, मुरारचें मन अनिर्बंधपणें रमूं लागतें. या मनाला ओढ लागलीच तर '······ओढ सगूची परी घराला येण्याला मग लावी !' अशी लागते. परंतु जगाला सुन्दर मानून, बालकाच्या निरागसतेनें त्यावर विश्वासून मान ठेवणाऱ्या मुरारला सगुणेच्या प्रीतीचा प्रभाव क्षणभरच रोखूं शकतो. बालपणाप्रमाणेंच यौवनांतहि चंचलपणाच्या हातीं मनोवृत्तीचीं सूत्रें जातात; आणि मुरारसारख्या तरुणाची··· 'सगुणेपासुन दुरावल्यावर दुबळें होई चित्त !' अशी अवस्था होते.

मुरार आणि सगुणा यांच्या नाट्यपूर्ण जीवनांतील तिसऱ्या अवस्थेला तापसरीच्या सांथीला बळी पडून मुरारच्या मातापित्यांच्या

मृत्यूनें आरंभ होतो. या दुःखांतून तीं दोघें कुठें सावरतात, तोंच हिरूचा जन्म आणि मानाजीचा मृत्यु या आनंदमय आणि दुःखमय घटना त्यांच्या जीवनांत प्रवेशतात. खेडोपाडीं येणाऱ्या रोगराईच्या साथींत शेकडों कुटुंबें उध्वस्त होतात. तिथें या तीन पात्रांचा लागोपाठ आलेला मृत्यू स्वाभाविक आहे काय, हा प्रश्न वास्तवतेच्या भूमिकेंतून उपस्थित होत नाहीं. अस्वभाविकता वाटलीच तर, हे प्रसंग रंगविण्यासाठीं पांचव्या आणि सहाव्या बहारांत कवींनीं जें नाट्य उपयोगांत आणलें आहे, त्यामुळें वाटतें. मुरारच्या आयुष्याच्या चौकटींत त्याला संपत्ति आणि स्वातंत्र्य देण्यापलीकडे या पात्रांच्या मृत्यूला फारसा अर्थ नाहीं. त्यामुळेंच मानाजीच्या मृत्यूचें सविस्तर वर्णन आणि '…किरन् पगां ह्ये आम्ब्यावरतीं, किरन पगा…' हे मानाजीचे उद्गार नाट्यापेक्षां नाटकीपणाच अधिक दर्शवितात.

स्वतःच्या चैनबाजींत वीस हजारांची ठोकर बसली असतांना, आणि मानाजीला 'आम्बराई' प्राणपणानें जपण्याचें वचन दिलें असतांना, मुरारच्या अधःपाताला आलेलें उधाण आणि सगुणेच्या सात्विक सहनशीलतेची कसोटी, ही त्यांच्या सांसारिक जीवनांतील चौथी अवस्था आहे. ही अवस्था चित्रित करीत असतांना गिरीशांनीं रंगविलेले लहान-सहान प्रसंगहि अत्यंत नाट्यपूर्ण आणि हृदयस्पर्शी आहेत. अनिर्बंध स्वातंत्र्य आणि संपत्तीच्या प्राप्तीनें मुराला मिळालेली 'सत्ता आंधळी करूं' लागते, यापुढें तो 'राजरोस घोडेशर्यत' खेळावयास पुण्यास जाऊं लागतो. आणि त्याची विवेकबुद्धि जागी झालीच, तर त्याचे मित्रगण 'मदिरेच्या पानानें तिला निजविण्यास' मागें पुढें पाहात नाहींत. अशा मार्गानें कुबेराला भीक लागण्यास काय अवकाश ? दुसऱ्या अपत्याचा जन्म आपत्काळीं होऊनहि मुरारचे डोळे उघडत नाहींत ! आणि तो 'ऋण काढून सण' साजरे करण्यास सुरुवात करतो. अशा मार्गानें घर–दार,

गाडी–घोडा, मोट–नाडा, गुरें–ढोरें सारें नाहींसें होतें! आणि स्वतःच्या चैनीसाठीं अन्नदाता नांगरहि विकून टाकण्यास मुरार कमी करीत नाहीं. उन्मादांतील अधःपाताची अवस्थाच अशी असते कीं, परिस्थितीच्या झळा लागल्याखेरीज सांगितलेल्या उसन्या शहाणपणानें माणसाचे डोळे उघडत नाहींत. शिलोजी आणि सगुणा यांना मुरारला आवर घालतां येत नाहीं, याचें कारण तरी हेंच आहे.

'आम्बराई' विकून त्या पैशावर चैन करण्यांत रमलेल्या मुरारला घरांत उपासमारीनें हैराण झालेल्या तीन जीवांची स्मृति येत नाहीं. आपलीं सारीं दुःखें ओठाआड दाबून ठेवणारी सगुणा अखेर पोरांच्या पोटासाठीं एक थाळी पदराखालीं घेऊन गहाण टाकण्यासाठीं निघते, तोंच दारांतच तिची आणि निष्कांचन होऊन परतलेल्या मुरारची गांठ पडते. या प्रसंगातील कारुण्य जितकें आर्त तितकेंच नाट्यपूर्ण आहे. मित्रांनीं फसविलेला आणि लुबाडलेला मुरार सोप्यात उसासे टाकीत बसला असतांना, एका फकिरानें रस्त्यावर 'पैसा' हें हृदय कापीत जाणारें गाणें म्हणावें, या परती कठोर वास्तवता ती कोणती? परिस्थितीच्या कठोरतेनें मुरारच्या आत्मिक शक्ति खचून जात नाहींत; उलट उन्मादाची मनोवस्था ओलांडतांच त्या कणखरपणें वर उफाळूं लागतात हीं त्याच्या स्वभावचित्राच्या दृष्टीनें एक वैशिष्ट्यपूर्ण बाब मानली पाहिजे. भिकेला लागण्याची वेळ आली तरी मुरार···'पैसा अडका जवळ न कांहीं, तरि निधड्या छातीनें। उद्योगाला जाया सजला···' या वृत्तीनें मुंबईला जाऊन रोजगार करून नशीब काढण्याचें तो ठरवितो. आईबापाच्या प्रेमाची खूण म्हणून जवळ बाळगलेलें डोरलें सगुणा कठोर मनानें मुरारच्या गाडीभाड्यासाठीं पंधरा रुपये उभे करावेत म्हणून विकून टाकते, ही या काव्यांतील अत्यंत हृदयस्पर्शी घटना आहे. उन्मादावस्था ओलांडलेल्या मुरारवर त्याचा तीव्र परिणाम झाल्याखेरीज राहात नाहीं. त्यामुळेंच, कांहीं काळा-

पूर्वी कफल्लक अवस्थेंत, पैशाचें महत्त्व भेदक रीतीनें गाण्यांतून पटवून देणाऱ्या फाकिराला उरलेला अखेरचा पैसा देऊन टाकणारा मुरार, आगगाडींत दारूची लावणी म्हणणाऱ्या शाहीरावर खूष होऊनहि त्यानें पुढें पदर पसरतांच—

" खिशांत गेला कर स्वभावें, दिसली सगुची मूर्ती,
' जपून वागा '–वचन थांबवी; न करी आशापूर्ती ! "

असा औदार्याचा हात मागें घेतो. या दोन लहान सुंदर प्रसंगांतून छायाप्रकाश-तत्त्वानें मुरारचें अवस्थांतर सूचित करण्यांत गिरीशांनीं अव्वल-दर्जाची नाट्यदृष्टि दाखविली आहे यांत शंका नाहीं.

' परेळमधल्या कोंदटलेल्या गल्लीमधील खोली, ' वास्तव्यभूमि म्हणून करण्याचें मुरारच्या नशिबीं आल्यापासून त्याच्या जीवनांतल्या पांचव्या अवस्थेला आरंभ होतो. गिरणगांवांतल्या आपल्या मित्रांची दशा पाहून, पूर्वी हळहळ व्यक्त करणाऱ्या मुरारवर कालांतरानें—

" वाटे त्याला–पोट अरेरे, काय चीज ही देवा !
पोटासाठीं हाय, करावी कुणी कुठेंही सेवा ! "

असेच उद्‌गार काढण्याची पाळी येते ! या उद्‌गारांची दोन भिन्न प्रसंगांतील पुनरुक्ति दैवदुर्विलास ( Tragic Irony ) सूचित करते. गिरणींत कापूस फोडण्याचें काम करीत असलेल्या मुरारला, समोर कोणी एक ' भरवित होता घास, घेउनी सांगातीं निजलेक ' असा दिसावा, आणि त्याचा हात थांबला म्हणून त्याची कामावरून उचलबांगडी व्हावी; आणि अखेर् त्याला धीटपणें हमालासाठीं चौकांत जाऊन उभें राहावें लागावें, आणि तोडी उचलण्याचें काम करावें लागावें, या अत्यंत कारुण्यपूर्ण घटना आहेत !

मुरारचें आजारीपण; सगुणेनें त्याची केलेली शुश्रूषा; मुरारचा पश्चात्ताप; नव्या जोमानें परत शेतावर जाऊन, स्वतः राबून

विसकटलेला संसार पुन्हा उभा करण्यासाठीं त्यानें दाखविलेला कणखरपणा आणि शिलोजीनें मित्रकर्तव्याला जागून हिरूच्या नावें ' आम्बराई ' त्यांना परत देऊन कथेचा केलेला गोड शेवट; इत्यादि घटना या संसार-चित्राची अखेरची छटा दर्शवितात. रुग्णाईत मुरारकडे जातांना केरूच्या मृत्यूची बातमी त्याला समजूं नये म्हणून हिरूलाहि घरीं ठेवण्यांत सगुणेनें दाखविलेला मनावरील संयम, गिरीशांनीं अत्यंत हृदयस्पर्शी रेखाटला आहे. शिलोजीनें बजावलेल्या मित्रकर्तव्यात अस्वाभाविकता आहे, अशी अनेक टीकाकारांनीं तक्रार केलेली आहे. निपुत्रिक शिलोजीनें मुलीसमान माया लावलेल्या सगूला तिच्या आपत्काळीं मदत करावी आणि आपलें सर्वस्व वेचून तिची 'आम्बराई' म्हणजे तिची 'चोळीबांगडीच' तिला परत मिळवून द्यावी, यांत वस्तुतः अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. भुके-कंगालींत जन्माला आलेल्या आजच्या पिढीला पंचवीस तीस वर्षांमागील जानपदांच्या जीवनांतील निष्ठांची कल्पना येणें शक्य नाहीं. त्या काळां-तील ग्रामीण मनोवृत्तीशीं शिलोजीनें दाखविलेली ही निष्ठा पूर्णपणें सुसंगत आहे. परंतु शिलोजीचें पात्र बाजवीपेक्षां जास्त पार्श्वभागांत राहिल्यानें शेवटीं या घटनेच्या निमित्तानें या पात्राला आलेलें महत्त्व उपरें आणि अकलात्मक वाटतें. ' ऐती मिळकत मंजे काका अतां वाटते माती ! ' याची जाणीव झालेल्या मुरारची अवस्था म्हणजे उन्मादावस्था ओलांडतांच, कणखर वृत्तीच्या शेतकऱ्यांत त्याची झालेली परिणतिच होय; आणि त्यामुळेंच कथेचा शेवट सुखान्त व्हावा हेंच स्वाभाविक वाटतें.

## निसर्गाची छाया

मुरार आणि सगुणा यांच्या संसारचित्रांत नाट्यप्रसंगांनीं जेवढी सर-सता निर्माण केली आहे, तेवढाच विविध प्रकारच्या सृष्टिवर्णनानीं या काव्याला वेगळाच उठावदारपणा आणलेला आहे. हीं सृष्टिवर्णनें रंगरेखा-संगतीनें इतकीं नटलेलीं आणि ग्रामीण जीवनांतील बारकाव्यांनीं इतकीं

सजलेलीं आहेत कीं, त्यामागील प्रयोजक-अप्रयोजकपणाची रसिक मनास विस्मृतीच व्हावी. आरंभीचें वर्षाऋतूचें, वेळू, अम्भेरी आणि कमण्डलू यांच्या भौगोलिक स्थितीचें, शरदऋतूच्या बहर निमाल्यानंतर थंडीमधल्या माळेराखणीचें,हेमन्तांतील ऐन थंडीच्या कडाक्याचें,उन्हाळयांतील उघड्या नांगरलेल्या रानांतील मोहक मृगजळाचें, श्रावणमासांतील जळमोत्यांच्या राशींचें, हीं सर्वच वर्णनें गिरीशांच्या मृदुमधुर शैलीनें चित्तवेधक झालेलीं आहेत.या वर्णनांत कल्पनारम्यतेप्रमाणें निरीक्षणाचे असलेले बारकावेहि बहारदार आहेत. उदा० डोंगरओढयाच्या प्रवाहाचें वर्णन करतांना––

“ मधेंच कोठें पाण्यामध्यें शोभे खडकी बेट,  
शुभ्र तुऱ्यांचें त्याच्या भंवतीं वरतीं आले देठ;  
शेवाळोनी जळांत गेले बाजुस फत्तर कांहीं,  
गळां घातलीं होतीं लेणीं रानपाचुचीं वा हीं ! ”

अशा कल्पनारम्य काव्यपंक्ति आलेल्या दिसतात. या दृष्टीनें या काव्याच्या अखेरीस आलेले ‘ वडलिम्बांतून वाहणाऱ्या वासन्तिक वाऱ्याचें’ वर्णनहि पाहण्यासारखें आहे. चित्रमयतेच्या (Picturesque) गुणांबरोबरच या वर्णनांतून अनेक ठिकाणीं रंगसंगतीची रेखीव जाणीवहि व्यक्त होतांना दिसते. साध्या उसाच्या पात्याचें चित्र उभें करताना ‘ हिरव्या रुन्दट पानीं शोभे हळदीवरली कान्ती ’ अशी रंगाची नाजुक खुलावट दिसते. या वर्णनौघांत ग्रामीण जीवनांतील बारकाव्यांची समृद्धि अनेकवेळां प्रत्ययास येते. खडकामधून आलेल्या ‘ बारीक जिव्हाळयाला पान लावून ’ घडा भरणारी सगुणा, पिकें काढून ‘ रानांत बुचाडें ’ रचणारे आणि धान्य मळण्यासाठीं खळयांत ‘ मोगण आणि माडें ’ घालणारे शेतकरी, इत्यादि विविध सूक्ष्म चित्रें गिरीशांचें ग्रामीण जीवनाचें निरीक्षण पानोपानीं प्रत्ययास आणतात. मात्र या

वर्णनांत कधीं कधीं फाजील कल्पनारम्यता आणि सांकेतिकता डोकावते आणि मग हीं वर्णनें बालकवींच्या वळणावर गेल्यासारखीं वाटतात.

“ वारा होता फुलवित कोणा आलिंगनदानानें,
भृंगे मंजुळ गुंजन करुनी रमले मधुपानानें. ”

या सारख्या ओळी बालकवींच्या नावावर सहज खपून जाण्यासारख्या आहेत.

## वर्णनशैलींतील विविधता

गिरीशाची शैली सृष्टिवर्णनांत जशी मृदुमधुर स्वरूप धारण करते, तशीच ती इतरत्र रसकालस्थलानुरूप आपला साज सहजतेनें पालटूं शकते. प्रस्तुत काव्यांतील मुरार आणि सगुणा यांच्या व्यक्तिरेखा ‘ ब्रह्मपुरी ’ आणि ‘ पाली ’ येथील जत्रा, मुंबईतील रुग्णालय इत्यादींचें चित्रण वैशिष्ट्यपूर्ण उतरलें आहे. रोगराईच्या वर्णनांत पोटच्या पोराला वांचविण्या-साठीं ‘ शेतकऱ्यानें डाळीम्बाला विकला एक दिवाणा ’ हा आलेला उल्लेख हृदयस्पर्शी वाटतो. जीवनांतील कुरूपांगाचें वर्णनहि गिरीश किती बारकाईनें करूं शकतात हें पाहावयाचें असेल, तर मुंबईच्या मजूर वस्तीचें त्यांनीं केलेलें चित्रण पाहावें. या वर्णनांतील, वरतीं लोंबणारीं ‘ काळीं भुरकीं जुनीं कैंबरें, ’ ‘ भिंतीवरला मेंचटलेला धुरकट काळा रंग, ’ किंवा

“ करकर वाजुनि दार मोडकें गळे पिठाचा चूर,
सताड उघडें पडलें तरिही राहे आंतच धूर ! ”

या सारखे बारकावे रसिक मनांत साक्षात् चित्र उभें करूं शकतात. विविध वर्णनाचें वैपुल्य सर्वच ठिकाणीं प्रयोजकतेनें आलें आहे असें नाहीं. परंतु मूळ काव्यकथेला रंगत येण्याच्या दृष्टीनें या वर्णनांनीं प्रस्तुत काव्यांत ठळकदार कामगिरी केली आहे, यांत शंका नाहीं.

'प्रस्तुत काव्यांत अलंकार आणि सुन्दर कल्पना यांचें दुर्भिक्ष आहे,' अशी एका नामवन्त टीकाकारानें तक्रार केली आहे, तिची मीमांसा या ठिकाणी करणें इष्ट वाटतें. 'आम्बराई'त अलंकारांची समृद्धि प्रत्ययाला येत नाहीं, एवढाच या विधानाचा रोख नाहीं. गिरीशांच्या मनाच्या चौकटींत चमत्कृतीला असलेलें दुय्यम स्थान आणि त्यामुळें त्यांच्या काव्यांवर झालेला त्याचा बरावाईट परिणाम याची चर्चा मागें झालेलीच आहे. परंतु अलंकारांचें वैपुल्य नाहीं म्हणून हें सबंध काव्य हिणकस आहे, असा दावा मांडणें, म्हणजे बालकवींच्या काव्यात वीररस वा फडक्यांच्या कादंबरींत भक्तिरस नाहीं म्हणून त्या कृती टाकाऊ ठरविण्यासारखें आहे. एरवीं—

"पाणबुड्यापरि बुडी देउनी किंवा नयनाब्धींत–
अन्योन्यांच्या शोधित होतीं प्रेममौक्तिकें आत."

यासारखें सांगरूपक किंवा दारूच्या लावणींतील—.

"लागे दैवाचा बाण । झाली घरांत वाण
आद्या गेलें वळचणीचें पाणी !"

या सारखा सुन्दर विरोध, किंवा दहाव्या बहरांत मुरारच्या व्याकूळ मनःस्थितीचें वर्णन करीत असतांना, डोंगर रानांतील वणव्यांत होरपळणारे जीवजिवाणु आणि दुरून त्या वणव्याचें सौंदर्य प्राशन करणारे रसिक, यांची रंगविलेली 'प्रदीर्घ उपमा' (Homeric Simile) या काय अशा भाष्यकारांना उमजल्या समजल्या नसतील? कल्पनेच्या सौंदर्याची प्रचीति व्यक्तिगत असल्यानें अभिरुचीच्या भिन्नतेला वाव ठेवला, तरी या काव्यांत एकहि सुन्दर कल्पना नाहीं असे उद्गार केवळ एक दुष्टबुद्धि किंवा अडाणी टीकाकारच काढूं शकेल यांत शंका नाहीं.

## उपदेशक

मात्र या वैशिष्ट्यांचा उल्लेख करतांनाच 'आम्बराईच्या' अन्तरंगांतील एका वैगुण्याचा उल्लेख करावयास हवा. लहानमोठ्या प्रसंगांतून तत्त्वज्ञान काढून उपदेश करण्याची गिरीशांची वृत्ति वेळीं अवेळीं प्रगट झाल्यानें रसभंग झाल्याचीं उदाहरणें प्रस्तुत काव्यांत कांहीं कमी नाहींत. चिंतनशीलतेचें काव्यांतील स्थान मान्य केलें तरी कथाकाव्यांतील तिची लुडबुड अनेक वेळां रसापकर्षक होण्याचीच शक्यता असते. गिरीशांच्या मधील हा तत्त्वमीमांसक व उपदेशक 'आम्बराईत' अवेळीं डोकावून केवळ रसभंगच करतो असें नाहीं तर त्यांची मीमांसा वा त्यांचा उपदेश उथळ आणि मामुली स्वरूपाचा असतो. पुत्रोत्सवविभवांत रमलेला मुरार पाहून कवि मधेंच डोकावून 'अज्ञ जिवाला माहित नसतें परी अरेरे कांहीं' इत्यादि भविष्याची सूचना देऊं लागतो. मुंबईच्या मजूरवस्तीचें यथार्थ वर्णन करून समाधान न झाल्यानेंच की काय, कवि 'हर ! हर ! आम्ही स्वर्ग सांडुनी तरिच गाळतों पूर' इत्यादि प्रवचन करूं लागतो. 'आम्बराईचा' सौदा करण्यांत मुरार गढला असतांना कवि मधेंच पडद्याआडून 'कशास गेले दूर शिलोजी या वेळीं परगांवीं ?' असला आगंतुक प्रश्न करतो. ज्या कथाचित्रणाचा भर प्रामुख्यानें नाट्यपद्धतीवर आहे, त्यांत या वृत्तीमुळें उणेपणा निर्माण झाला असल्यास नवल नाहीं. या वृत्तीचा आणखी एक अतिरेक म्हणजे 'कमंडलू' ओव्यांचा प्रत्येक प्रकरणाच्या अखेर जो उल्लेख आलेला आहे, त्यांत दिसून येतो. या उल्लेखातून कवीला सूचित करावयाचा असलेला आशय लक्षांत घेऊनहि, त्याची योजना सर्वच ठिकाणीं चपखल झालेली दिसत नाहीं. हा उल्लेख आणण्यासाठीं कवीला करावा लागलेला द्राविडी प्राणायाम पाहिला, म्हणजे जुन्या पंडित कवींच्या घटपटादि खटपटींची आठवण झाल्याखेरीज राहात नाहीं.

गिरीशांची तुलना अनेक टीकाकारांनीं टेनीसन्‌बरोबर केलेली आहे. आणि त्यांतील कांहींनीं तर टेनीसन्‌च्या उपदेशकीवृत्तीकडे या तुलनेंतील साधारणधर्म म्हणून बोट दाखविलें आहे. परंतु टेनीसन्‌च्या कथा-काव्यांत असा रसापकर्षक उपदेशी बाणा कोठें व्यक्त झाल्याचें दिसत नाहीं. टेनिसन्‌च्या कथाकाव्यांत गिरीशांच्या कथाकाव्याप्रमाणेंच निसर्गाचाहि भरपूर उपयोग करून घेण्यांत आलेला दिसतो हें खरें. परंतु या बाबतींतहि टेनीसन्‌ची दृष्टि अगदीं वेगळी आहे. एका इंग्लिश टीकाकारानें म्हटल्याप्रमाणें—"The main point to observe, therefore, about Tennyson is that in him we have the scientific observer and the artist, rather than the interpreter of nature..."

गिरीशांच्या काव्यांत नुसतें निसर्गवर्णन नाहीं, तर निसर्गाचा अन्वयार्थ ( Interpretation ) लावण्याचा प्रयत्न आहे; आणि तोहि प्रामुख्यानें आहे. त्यामुळेंच अशा तुलनेंतून फारशी निष्पत्ति होत नाहीं. प्रत्येक मराठी कवीला इंग्रजी साहित्यांतील एकाद्या कवीच्या नांवाची झिरझिरीत ओढणी घालण्याच्या या उथळ आणि अनिष्ट पद्धतीचा निदान सुज्ञ आणि प्रज्ञ म्हणवणाऱ्या टीकाकारांनीं तरी आतां त्याग करण्याची वेळ आली आहे असें वाटतें. अशा तुलनेंत दोन्ही कलावंतांचें मूल्यमापन बाजूला राहून, स्वतः टीकाकारांचें पांडित्य मात्र उघडें पडण्याचा संभव अधिक आहे.

## कलाकुसर

असाच द्राविडी प्राणायाम, प्रस्तुत काव्यांत यमकरचना आणि पदपूरणार्थ राबविलेलीं विशेषणें या बाबतींत झालेला आहे. गिरीशांच्या एरवींच्या प्रासादिक शैलींत या वैगुण्यानें विषमता निर्माण झालेली आहे.

आशय-व्यक्तीसाठीं विशेषण येण्याऐवजीं, वा कल्पनेंतून यमकनिर्मिति-होण्याऐवजीं, कवि शब्दाकडून कल्पनेकडे गेलेले दिसतात. ' घोर-फार-छान-नीट ' इत्यादि मंडळी या काव्यांत अकारण पानोपानीं प्रस्थान टाकून बसलेली दिसतात. ' गोण्डा ' साठीं आलेला ' ओण्डा ' आणि ' ओढा ' साठीं आलेला ' थोडा ', अर्थव्यक्तीपेक्षां आगन्तुकीच अधिक दर्शवितात. मात्र प्रस्तुत काव्यांतला या लकबीचा अतिरेक हें कवीचें वैयक्तिक वैगुण्य मानलें, तरी प्रदीर्घ काव्य वृत्त-जातींत रचणाऱ्या कोणत्याहि कवीला एक तर यापुढें मुक्तछंदाकडे वळलें पाहिजे, नाहीं तर मोरोपंतादि पंडितमंडळींना एकलव्यवृत्तीनें आपले द्रोणाचार्य करून आपल्या घराच्या भिंती यमकांनीं चितारून ठेवल्या पाहिजेत. त्याखेरीज या अनैसर्गिक आणि दण्डेलीच्या प्रकारावर त्यांना मात करतां येणें शक्य नाहीं.

## जानपद भाषा

जानपद काव्यांतील भाषेसंबंधीं मराठींत विपुल चर्चा झाली आहे. जानपद काव्यें जानपद भाषेंतच लिहिली पाहिजेत असा आग्रह धरणारे श्री. ग. ल. ठोकळ, आणि या काव्याचा वाचकवर्ग मध्यमवर्गीय पांढर-पेशा आहे, म्हणून हीं काव्यें नागर भाषेंतहि सरसतेनें लिहितां येतात, असें प्रतिपादणारे के. नारखेडे, (' शिवार'-प्रस्तावना ) हे दोघेहि एकान्तिक भूमिकेवरून अर्धसत्य सांगत आहेत असें वाटतें. भाषा हें प्रामुख्यानें अर्थव्यक्तीचें आणि वातावरणनिर्मितीचें साधन आहे; कवीचें वैयक्तिक पांडित्य व भाषाप्रभुत्व यांचें प्रदर्शन करण्याचें साधन नाहीं. जानपद भाषेला जोंपर्यंत कोंकणी प्रमाणें स्वतंत्र अस्तित्व नाहीं, तोंपर्यंत ललितकृतींतील तिचें स्थान नागरभाषेला धरून, वातावरण निर्मितीपुरतेंच राहिलें पाहिजे यांत शंका नाहीं. या दृष्टीनें गिरीशांनीं स्वीकारलेला, आणि प्रथमावृत्तीच्या प्रस्तावनेंत व्यक्त केलेला··· " काव्या-

मध्यें संभाषणप्रसंगांच्या वेळेस पात्रानुरूप भाषा घालून, कवीला जेव्हां स्वतंत्रपणें कांहीं सांगावयाचें असतें, त्यावेळीं त्यानें तें स्वतःच्या भाषेंत सांगावें हें उचित होय···" हा दृष्टिकोन कोणालाहि पटण्यासारखा आहे. ही भूमिका गिरीशांनीं आपल्या काव्यांत यशस्वीपणानें पार पाडली आहे. विशेषतः त्यांनीं योजलेल्या संवादांत जितका नाट्यगुण दिसतो, तितकाच भाषेच्या दृष्टीनें त्यांत चपखलपणा दिसतो आणि वास्तवदृष्टिहि प्रत्ययाला येते.

## भावगीतें

हें सबंध काव्य 'साकी' या जातींत लिहिल्यानें कंटाळवाणेपणा येऊं नये, यासाठीं गिरीशांनीं काव्यकथेच्या ओघांत कांहीं स्वतःचीं तर कांहीं दुसऱ्यांचीं पदें-भावगीतें यांची योजना केली आहे. कथेच्या दृष्टीनें या भावगीतांच्या जागा नुसत्याच निर्दोष आहेत असें नाहीं, तर या गीतांनीं प्रस्तुत काव्याला एक वेगळाच गोडवा आणून दिलेला आहे. 'पैसा', 'दारूची लावणी' हीं गीतें हृदयस्पर्शी, तर 'विरहगीत' आणि 'पिरतीची किरत' हीं अत्यंत भावरम्य वठलीं आहेत. कविवर्य तांबे यांनीं 'दारूची लावणी' आणि 'पैसा' हीं गीते ग्रोटेस्क-रासवट गीता-सारखीं असतीं तर बरें झालें असतें, असें म्हटलें आहे. परंतु मला तें मान्य नाहीं. या दोन्ही गीतांच्या जागा आणि त्यांतील विषय, गंभीर स्वरू-पाचा आहे. त्यामुळे या कवितांची रासवट रचना निश्चित रसापकर्षक झाली असती, याविषयीं मला संदेह वाटत नाहीं.

प्रस्तुत काव्याचें लावलेलें परीक्षण वस्तुतः इथेंच संपावयास हवें. हें परीक्षण प्रामुख्यानें महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना त्यांच्या अभ्यासक्रमांत उपयुक्त व्हावें या दृष्टीनें लिहिलें असलें, तरी या काव्याकड आणि तज्जन्य उपस्थित होणाऱ्या प्रश्नांकडे पाहण्याचा माझा दृष्टिकोन मराठी साहित्यांतील विद्वान् रसिक टीकाकारांच्या पुढे चिकित्सेसाठीं

आता रुसवा कां ग आला ?
येळ केला भेंटायाला,
व्याकुळ होउन जिव लागे झुरणी ग ! ४

गाणें ऐकुन आग मनाची वाढे भरवेगाने,
तीव्र घातले घाव जिव्हारीं त्याच्या, जणु कीं गानें. १६८०
अता सगूचें दर्शन कसलें ? कोण जिवाला भाई ?
ओकओकुनी जीव तयाचा व्याकुळ होउन जाई !
काय जहालें सगुचें ? जाणुनि सारें अन्तर्ज्ञानें—
कमण्डलूनें साङ्गितलें तिज नाही का हें गानें ? १६८४

* * *

## बहार ११ वा

# सहभावनेचें तारायन्त्र

देवदेव जों करावयाला जाय शिलोजी दूर—
मास लोटला पुरा तयाला; नुकता जाय मुरार !
दारिद्र्याने हतबल केलें सगुला आणि मुलांना,
कहर कहाली सुकवूं लागे गोड अनाथ फुलांना.
दु:खसागरीं तिच्या मनाची हेलावूनी वेला,
चिन्ताश्रूंनीं पदर जाहला ओला वेळोवेळां.
केव्हा देउन भाकर नुसती, केव्हा नुसतें पीठ,
भूक भागवी बाळांची, ती सती मनाची धीट.
एक दिनीं मग दारिद्र्याने केली पुरती मात,
केरूवरती खल रोगाने घोर टाकिला हात !

कसा धरावा तग पोटाने केवळ मिळतां पीठ,
तीव्र आतपीं केवळ, कैसें फूल फुलावें नीट.
दूध ठरेना पोटीं, औषध लवहि मिळालें नाही,
माण्डीवर तों घेउन बसली दीनपणाने आई.
कुणि शेजारी आयाबाया येउन बघती हाल,
आंत होउनी तळमळ, सगुचे भिजले होते गाल.
माण्डीवरती तडफड आतां दीन मुलाची चाले,
व्याकुळतेने हृदय सगूचें भाजुन आंत निघालें.
तोंच लावुनी मातृमुखावर अखेरची तो दृष्टी,
सोडुनि गेला बाळ, त्यागुनी ही मायावी सृष्टी !

कुणास ठावें, किंवा घेउन आईचें गाऱ्हाणें,
देवाजीला साङ्गायाला केलें त्यानें जाणें !
हिरू बिलगला मुग्धपणें तिज ! कुरवाळी ती हातीं,
मुग्ध आसवें कांही दिन मग गळलीं दिवसारातीं !

वृत्त समजलें आणि शिलोजी आला टाकोटाक,
परिस्थितीने होय मनाची त्याच्या फाकाफाक.
मानाजीसम परि बोलूनी प्रेमळतेची वाणी,
धीर सतीला देउन, चित्तीं गूण तिचे वाखाणी.
उरल्यासुरलेल्याची लावुन पुरती विल्हेवाट,
हिरूसगूंना घेउन धरि तो मग वेळूची वाट.
मायपित्यांसम भवती होती प्रेमळ आता माया,
परी सगूच्या वदनीं पसरे खिन्नत्वाची छाया.
शिलुकाकांनी साङ्गसाङ्गुनी सान्तविलें मन भारी,
परि न शान्तली मुरारसाठी वृत्ति तिची झुरणारी.
कधी शिलोजीसङ्गें येउन अम्बराइच्या रानीं,
गुङ्गत बैसे खिन्नमनें ती कमण्डलूच्या गानीं.

बसली होती सायङ्काळीं दरडीवर ती आज,
विवळत होता ओढा, काढुन दुःखाचा आवाज.
सरकत होतीं आकाशावर चित्रें भरभर कांही,
मनःपटावर गतकालाचीं परि अपुलीं ती पाही.
ऐकुन वाणी कमण्डलूची अस्थिर मन तों झालें,
आणि लोचनीं एकाएकीं अश्रू दाटुन आले.
टपकत होते बिन्दु, शिलोजी तों न्यायाला आला,
मनीं दचकला ! परि घेउन तिज तो वेळूस निघाला.

विचार आले अनेक चित्तीं माजुनिया काहूर,
सगुच्या वदनीं मधुनच पाहे, वाटुनि तो हुर्हूर.
बघतां बघतां मानाजीची दिसूं लागली मूर्ती,
आणि लोपली साङ्गुन त्याला कर्तव्याची पूर्ती.
न कळे यांतिल आस्थिर चित्ता सगुणेच्या परि कांही,
चूर आपुल्या आन्तर दुःखीं गेले. ते लवलाही.

दिवस लोटले एकामागुन एक भराभर कांही,
परि अस्थिरता तिच्या मनाची लवही शमली नाही.
एकच आलें पत्र तयावर कळली नाही वार्ता,
हुरहुर दाटुन, हृदयीं आता होय सती दुःखार्ता.
गृहदेव्हाऱ्यामधे भवाचे नसतां प्रिय अधिदेव,
कशीं रुचावीं सुखें, वियोगुन जातां हृदिंची ठेव !
तशांत होउन केरुची स्मृति, जाळुन हृदया जाई,
संसाराच्या बागेतिल ही होरपळे मग जाई.
गोड शब्द या मायापित्यांचे प्रेमळ, गेले वाया,
जिवझुरणीनें व्याकुळलेली सुकूं लागली काया.
केव्हा रात्रीं झोंप न यावी; तारवटोनी डोळे--
कल्पनेंतुनी चित्रें बघतां, हृदय आंतुनी पोळे.
चैन पडेना, एकच लागे मुरारजीचा ध्यास,
दचकूं लागे मन अन्धारीं, होउन भेसुर भास !
एके रात्रीं स्वप्न तरळलें डोळ्यांपुढती स्पष्ट,
प्रीतीसाठीं अघोर दिसला तो करितांना कष्ट.
अन्नावांचुनि तो सुकलेली दिसूं लागली काया,
अजुन विनवणी दीन तयाची ये न कुणा ऐकाया.

तों गमलें की, राबत असतां कोठे ऐन दुपारीं,
कोणी मालक पाठीवरती निष्ठुर फटके मारी.
रक्त ओकुनी त्यांतच, वाटे, पडला येउन झीट,
आणि पडे तो किती वेळचा देवाघरचा कीट !
प्राण होउनी व्याकुळ नन्तर, वाटे, गेला सदनीं,
आली होती प्रेतकळा तों भेसुर त्याच्या वदनीं.
अन्थरुणाला खिळलेला मग दिसला त्याचा देह,
स्नेहांवाचून भयाण दिसलें, वाटे त्याला गेह !
आणि तयाने प्रिय नांवाची घेउनिया जपमाळ,
टकळी होती एकसारखी चालविली बहुकाळ.
अखेर होउन घसा कोरडा निश्चळ पडला वाटे,
आणि भराभर अश्रु लोटले सरसर डोळ्यांवाटे.
दचकुन बसली अन्थरुणावर उठुन सगू अन्धारीं,
तरी अजूनी नाचत होतीं भवती चित्रें सारीं.
अस्थिर झालें मन कळवळुनी, नेत्रीं सांडुन पाणी,
किती वेळ ती पहात बसली गुङ्गत वेड्यावाणी.
तळमळ होउनि तीव्र, लागलें कालवायला पोटीं,
प्रेमें करुणा हृदयींची ये उचम्बळोनी ओठीं.
फुटुन तांबडें, तोंच कोम्बडा परड्यांतुन आरवला,
शिलुकाकांचा अभङ्ग मञ्जुळ कानांवरती पडला !
हृदयामधलें दुःख आपुलें साङ्गायातें आज,
धीट मनाच्या निष्ठुरतेने तिने सोडिली लाज.
आवरुनी मन, उठली वेगें डोळां आणुनि पाणी,
शिलोजिची तों कानांवरती पडली प्रेमळ वाणी.

'सगू, कशानं डोळं भरलं ? काय जिवाला जालं ?
येडे पोरी, अजुन जिवाला······का मन कोटं भ्यालं ! '
फुटुन उमाळा तों हृदयींचा, तळमळ मनिंची सारी,
केली त्याला कथन सगूने, हृदया पिळवटणारी.
आणि पतीला भेटायाचा बसली धरुनी हेका,
शिलोजिचें मन पाझरुनी क्षण बोले 'मङ्ग जावं का ?
थाम्ब सगू पन् ! पतर घालुनि अपुल्या त्या भिवबाला,
सम्दी वार्ता पुसुन साङ्गतों चार दिसांनी तुजला !'
परि मानवलें हें न सगूला, पडला घोर विचार,
तोंच दुपारीं मुम्बईहुनी ये निकडीची तार.
जीव चरकला मग चिन्तेने, निश्चय झाला ठाम,
आणि ठरविलें शिलुकाकांनी सोडायाचें धाम.
शान्त विचारीं परी जरासे मागुन होता चूर,
पुटपुटले मग ते अपुल्याशीं लागुनिया हुर्हूर,
'खरंच येडा बिमार पडला ! देइल ओखद कोन ?
करील तळमळ, आन जिवाच जवळी न्हाइत होन ?
हिरू-सगूला घेउन जावं भेटायाला सङ्ग········· !
पन् केरूचं इचारलं तर···!' तोंच पालटे रङ्ग !
सगुणेला हें साङ्गुन त्याने पुढें टाकिलें कोडें,
अश्रू येउन, तिचें कचरलें क्षणभर मानस थोडें.
परि हळवें मन घट्ट करूनी,–'हिरूस आजीपाशीं–
ठेवुनि जावूं !'–बोले, आणिक गाळी ती जळराशी !

आर्त मनाने सगू निघाली चुम्बुन रडवे ओठ,
आवेगाने फुटे हिरूच्या अश्रुजळाचा कोट !

जीव टाङ्गला मागे, मानस खाई पुढती ओढ,
संयमुनी मन परी निघाली घेउनि पापा गोड.
दीनपणाने राहुन दारीं, धरि आजीचा हात,
रडक्या नेत्रीं देत हुन्दके राहे बाळ पहात.
धडधड गाडी उधळत गेली अम्बेराईतून,
तळपत होतें डोक्यावरती प्रखर अजूनी ऊन.
द्याया आशीर्वाद सतीला माहेराची वाणी–
कमण्डलूच्या जळीं बोलली मङ्गल अपुलीं गाणीं ! १८०८

* * *

## बहार १२ वा

# रुग्णालयांत

ऐकुनि गाणें आग लागली मुरारच्या हृदयाला,
आधिव्याधी सर्वाङ्गाला लागति भाजायाला.
आवरुनी मन धरितां धरितां निसटुनि गेलें पुरतें,
तीव्र भडकलें, ताप वाढुनी, व्याकुळुनी आतुर तें.
त्यांत ऐकुनी—" व्याकुळ होउनि झुरणी लागे जीव ! "
पूर्वस्मरणें पुढती राहुनि उभीं, वाढलें हींव.
डोळे ताणुनि निश्चळतेने केंव्हा इकडे पाहे,
केंव्हा तिकडे; केंव्हा वरती तरळुनि दृष्टी वाहे.
समोर त्याला दिसूं लागली मूर्ति सगूची एक,
आता दुसरी, आता तिसरी, सुटला आणि विवेक.
हात पसरुनी पुढती, घेउनि नामाची जपमाळ,
बोलावी तिज करुण वचाने बरळुनि कांही काळ.
' झुरणी लागे जीव ! कोन तू—सगू, सगू तू माजी.
खरी खरी का तूच सगू ही ? आलिस होउन राजी ?
सगू दया कर, दूर उभी कां ? ये ये जवळी बाई,
इकडं आलिस कवा, कशाला ? आन कशाच्या पायीं ?
झुरणी लागे जीव किती त्यो, का म्हुन् जाशी मागं,
याकुळ जाला जीव, कशाचा आला तुजला राग ?
फिरलों सङ्गं रानोमाळीं नग अशी तूं पाहूं,
माज्याजवळी बैस जराशी, रानीं सङ्गं जाऊं.

पोरं हैती कुटं ? कशानं रडवा जाला चेरा ?
अजून किंवा जिवा जाचतो कम्नशिबाचा फेरा ?
तोण्ड फिरवलंस् ! कुटं निगालिस् ? अग...! अरे ही गेली !
थाम्ब थाम्ब ग, साङ्ग सगू ही कां इतराजी केली !
कोंन पुन्हा तू ? सगू ? अशी कां पगतीस रागं रागं,
काय ? पुन्हा तू गेलिस ? सगुने येऊं कां मी मागं ?'
आवेगें तो चळवळला मग मूर्तीमागें जाया,
परन्तु पडला मागें, आणिक धडपड गेली वाया !

डोळे मिटुनी पडला होता लागुनि थोडी धाप,
थकलीं गात्रें आणि लागला पुन्हा चढाया ताप.
बसले होते हात कपाळा लावुनि कुणि शेजारी,
बघुनि अवस्था मुरारची ही घाबरले ते भारी.
थकल्या हातीं गालावरचे पुसुनी ओघळ ओले,
पुन्हा करूनी धीर मनाचा, उघडून डोळे बोले.
केव्हा 'पाणी !'-केव्हा 'सगुने'–केव्हा 'आई ! आई !'
कण्हुनी अर्धमुर्धे यापरि शब्द वदे तो कांही.
'तुझ्या मुराच्या पिर्तीसाठी, क्षमा कराया त्येला—
ये ग एकदा ! याकुळलेला जिव हा फार भुकेला.
न्हाई सगुने ?...सगुने !...सगुने...!' बोलुनि इतुके शब्द,
जीभ कोरडी पडुन, जरासा मुरार झाला स्तब्ध !

अखेर घेई क्षीण वचें तो एक सगूचा ध्यास,
आणि बोलला मधुनी मधुनी 'येक येवडी आ...स'

तोंच वाजलें कवाड आणिक सगुणा आली आंत,
घाबरली ती; जवळी जाउन बघे लावुनी हात !
शिलोजीनी तर चाचपुनी कर, हाक मारिली त्याला,
कण्ठ दाटुनी, सगुणा विनवी डोळे उघडायाला.
शुद्धीवरती नव्हता तरि ही ऐकुनि करुणावाणी,
डोळे उघडुनि सगुणेवर तो दृष्टी अपुली ताणी
सगुणा बोले ' वळाकलं का मजला ? आल्यें आता !
वळाकलं-? मीं सगू !' अन्तरीं गहिवरली मग कान्ता !
निश्चल त्याची नजर लागुनी सगुणेवरती राहे,
लिखित तयाच्या दुर्दैवाचे सगुणा तींतच पाहे.
मग बोले ती शेजाऱ्यांना विनवुन भरुनी डोळे,
'इतुकं जालं आन कळालं काल ? हाय ! जिव् पोळे !'
ओठ जरासे हालवुनी तों मुरार बोलूं लागे—
'कोन...सगू तू ? न्हवस्...!' एवढे शब्द बोलतां भागे,
'मुरा असं ह्यें काय बरं ! मी सगूच, आता आलें !
बोला बोला वळाकलं का ? परान याकुळ जाले !'
'सगू न्हवस तू ?' या अर्थाचे बोलायातें बोल,
ओठ हालले इकडे तिकडे आणिक डोळे खोल.
आणि सांठलीं करुण आसवें त्याच्या डोळां दाट,
दाटुनि येतां कण्ठ, मिळाली शब्दास हि नच वाट.
पाहुनि त्याची अशी अवस्था सगुणेचें मन विरलें,
काळिज कोणी आंत तियेचें चरचर जाणों चिरलें.
कळवळुनी मग मुरार बोले ' इनती ऐका माजी–
रडूं नगा, मज साङ्गा सम्दं, करूं नगा इतराजी !'

शिलोजिंनी तों केली तिजला स्वस्थ बसाया खूण,
झटक्यामध्ये अस्फुट त्याची चाले परि भुणभूण !

आशा सुटली सकलांची मग चिन्ता सकलां जाळी,
न कळे दैवें काय ठेविलें वाढुनि पुढल्या काळीं.
सगुणा सेवा करि मातेच्या कोमळ पोटागीने,
भावव्याकुळ विनती ईशा प्रेमळ, नत वाणीने.
उपाय सरले सकळ मानवी आणि न उरली आस,
अघोर तळमळ प्रतिक्षणाला करपवि तज्जीवास.
धीर सुटूनी, पुढे शिलोजी भविष्य भलतें पाही,
परी सगूचा देवावरचा भाव निमाला नाही.
दुःख, काळजी, तीव्र वेदना सोशित असतां चार–
दिवस लोटले ! आणि गवसला नाही लव आधार.
दीन अवस्था पाहुनि त्याची भ्याले तेही फार,
घेउनि रुग्णालयांत गेले करण्यातें उपचार.

रुग्णालय नव सुन्दर दगडी, स्मारक औदार्याचें,
विलसत होतें आरामस्थळ दीनानाथजनांचें.
शिल्पसुबकता आणि भव्यता यांचा मिरवुन तोरा,
शोभे सुन्दर गगनामध्ये त्याचा उन्च मनोरा.
मधुनी मधुनी ठोके देउनि, घड्याळ बोलुनि बोल,
सुचवित होतें जीवितांतल्या प्रतिक्षणाचें मोल.
थोर जनांची दानशूरता अथवा उन्च सुराने--
जगता साङ्गे पुकारुनी हें दीनांचें रडगाणें.
धूसर काळे दगड घेउनी गारवेलिची शाल,
बसले दीनां आरामाया भिन्तींतून विशाल.

सभोवताली फुलवेलींचा बहरुन गेला बाग,
वळणें घेउन मधुनी गेल्या वाटा जागोजाग.
कडवेलींचें कुम्पण हिरवें, कापुन पाताळींत,
कार्यकुशलता दावी अपुली माळी हिरवाळींत
उन्च सुरूंची कोठे लववुनि खाली ताठर मान,
केली होती प्रवेशदारीं वाटेवरति कमान.
चौ-कोनांवर भुईनळयांपरि सीकर कारञ्जाचे--
उन्च फवारुन अङ्ग भिजविती खाली भूलतिकांचें.
कीं रुग्णालय ताज आणि हे भवति मनोरे चार?
वा नन्दनवन दीनांसाठी घेई हा अवतार?
आंत चकाकित जिकडे तिकडे नीटनेटकें सर्व,
प्रकाश-वायू खेळुन हरती जणु रोगांचा गर्व.
देवांची नव भिन्तीवरती चित्रें होतीं कोठे,
कुठे शिशूंचीं, देखावे वा कुठे आरसे मोठे.
एक हारिने भिन्तीसरशी सरळ माण्डिल्या खाटा,
मधुन फिराया शुभ्र रेखिल्या सङ्गमरवरी वाटा.
असे मधोमध मेज; तयावर उपकरणें हीं सारीं,
माण्डुन, बैसे लिहीत कोणी युवती–भगिनी–दारीं.
शुभ्रवासना गौरकाय ती फिरवुन चौकस डोळे,
शासित होती निजभगिनींना, केव्हा वदनीं बोले.
सेवारत कुणि दीन सेविका तडिल्लतेसम फिरुनी,
सुखवित होत्या शुश्रूषेने, कुणा निरामय करुनी.
वैद्य विशारद, शब्द न वदतां कार्यी होते दङ्ग,
रुग्णालयिंच्या या शान्तीचा न करी कोणी भङ्ग.

कोठे कोठे मात्र विचारी कुणि न मुळी अधिकारी,
म्हणुन ओरडे रोगी कोणी, दुःखें विवळुन भारी !
मुरारजीला इथेच आणुन, एका खाटेवरती !
नीट निजविलें; गेली नव्हती मूर्छा अजुनी पुरती.
कालपासुनी डोळे मिटुनी शब्द न वदतां कांही--
मुरार पडुनी शान्तपणाने दुःखें अपुलीं साही.
शुद्धीवरती परि आता तो होता पुरता आला,
क्षीणत्वाचा, खिन्नपणाचा ढग वदनीं ये काळा.
सगुणा होती जवळ बैसली रगडित डोकें हातीं,
मुरास वाटे झाली अपुल्या संसाराची माती !
दीर्घ सोडुनी सुस्कारा तो कण्हुनी डोळे उघडी,
वाटे त्याला आयुष्याची एकच उरली सुघडी.
थकलेले मग लोचन लावुनि सगुणेवर, तो पाहे–
एकसारखा, हृदयीं जळुनी तीव्र निराशादाहें.
ओठ हालले पुन्हा सगूशीं बोलायातें कांही,
दुःखवेदना भरून हृदयीं शब्दच फुटला नाही.
तळमळ मनिंची दिसूं लागली गात्रागात्रांतून,
करूं लागली जिभली धडपड टाकायास वदून.
ओठ उघडले, हलले आणिक मिटले दोन्ही वेळा,
खेचुनि शक्ती, बोलायाचा यत्न मुरानें, केला.
अखेर होउन डोळे सुस्थिर खिळले सगुणेवरती,
आणि हळुहळू साठूं लागे त्याच्या नयनीं भरती !
हळुच खोल जड शब्दीं बोले–' सगू...! ' आणि तो थाम्बे,
ओहळुनी जळ झर झर नयनीं अन्थरूण ओथम्बे.

शब्दाम्बुधि मग अडला ओठीं, आणि तयाची लाट,
नेत्रीं फुटली, अनुतापाची अवस माजतां दाट.
प्रेमभावना ढकली आंतुन शब्दांना बाहेरी,
आर्त मनांतिल शब्द प्रेमळ, करुण, सगू परि हेरी !
अखेर बोले थाम्बथाम्बुनी–' सगू, बु..ड..वली.. तु.ज.ला !
जातों..पोरं.. शिपत..थोर त्यो ! ' आणि अश्रुंनी भिजला !
वदनीं येउन भेसूर छाया मूर्च्छा आली घोर,
आणि वाटलें सकलांना, ती आली वेळ कठोर !

काव्य कवीचें लोपुन जावें काळयमाच्या पोटीं,
आणि उरावी एकच पङ्क्ती मधुर जनांच्या ओठीं,
आणि जनांनी लागावें मग शोध कराया त्याचा,
मिळूं नये परि हारवलेला दुवाच कधि काव्याचा,
आणि जनांनी पङ्क्तींतच त्या, अर्थशोधनासाठीं,
तर्क कसाला लावुन, करणें निष्ठुर आटाआटी,
तों उमगावा अर्थ तयाचा आणि मिळावा धागा,
आणि संव्यथा त्यातिल वेधी नाजुक हृदयविभागा,
त्यापरि, राहे विलापिका जी शब्दीं भरुन सुराची,
अर्थ उमगतां तिचा, दुणावे धडधड आर्त उराची !

परि द्यायाचा जिवास त्याच्या पूर्णपणें आराम,
उरलें होतें हेंच काय तें इतर जनांचें काम.
स्वस्थ तयाला पडूं दिलें मग सर्वांनी किति वेळ,
न कळे कोणा जगन्नायकें काय माण्डिला खेळ !

मात्र सगूला मुळि न राहवे, शान्तिमधे भेसूर
तेव्हा बोले हळु ती मधुनी काढुन रडवा सूर—
' मुरा काय ह्यॅ बरं ! तुमाला बरं करायासाटी—
आल्यें मी ना ? व्हनार् बरं ना आता माज्यासाठी ? '

गुङ्गुन पडला होता डोळे मिटुनी अजुन मुरार,
झुळझुळ तों ये पहाटवारा दारामधुनी गार.
सगुणा वदली शब्द पुन्हा ते व्याकुळुनी हृदयांत,
आणि पिङ्गळा झाडावरला दे तिज मञ्जुळ साथ.
तोंच उघडले हसऱ्या वदनीं हळुच मुराने डोळे,
प्रसन्नतेने हात सगूचा धरुनी मग तो बोले—
' सगू, तुझ्या किर्पेनं तर मग व्हनार काय बरा मी ?
व्हनार...!' हासे आणि पुन्हा तो श्रमुन पडे आरामीं.
स्वर्गसुखाचा अनुभव आला सगुणेला या वचनीं,
' मुरा, पर्भुच्या किरपेनं अं ! '–बोले, वर पाहूनी.
उत्साहाचें तेज चमकलें शिलोजिच्याही वदनीं,
उल्हासाची पहाट वाटे आली होती भुवनीं.
रुग्णालयही मुरास वाटे भरलें उल्हासाने,
खिडकींतुनही कानीं आलीं निसर्गसुन्दर गानें.
उल्हासाची पहाट दिसली त्याला सुन्दर लाल,
केशरकुङ्कुमरङ्गीं रङ्गे देह आणखी भाल.
शुभ्र दूरचे घुमट विलसले सुरम्य आरुण रङ्गीं,
नवतेजाने नभीं चमकले उन्च मनोरे जङ्गी.
जागी मुम्बापुरी होउनी भरली आवाजांनी,
घण् घण्, पों पों, धड् धड् आले ध्वनि गाड्यांचे कानीं.

नव्या दमाने चळवळ मार्गीं सुरू जनांची झाली,
चुली पेटल्या, तेजें फुलल्या तों मजुरांच्या चाळी.
तेज फाकलें, चढत चाललें वैभव आकाशाचें,
उल्हासाचा जोम अन्तरीं ज्याच्या त्याच्या नाचे.
नवसृष्टीच्या नव्या जीवना होई की सुरवात ?
निसर्ग होता नव्या दमाचें किंवा गायन गात ?
कुणास ठावें ! शिलोजिच्याही हर्ष न मावे पोटीं,
प्रफुल्लतेचा अभङ्ग नाचे तोंच, तयांच्या ओंठीं.
आणि येउनी कमण्डलूची हाक मुराच्या कानीं,
गमे, बोलली–' नवं जिणं ह्यें ! नवं जिणं ह्यें ! ' गानीं !

* * *

## बहार १३ वा

# स्वार्थत्याग

खपल्या सगुणा आणि सेविका रुग्णालयिंच्या फार,
हळू हळू मग पडूं लागला मुरारजीस उतार.
उत्साहाच्या सगुच्या शब्दें जीवन त्याला आलें,
सेवा घेतां प्रीतिकराची मानस त्याचें धालें.
अनुतापाची परन्तु जेव्हा तळमळ लागे हृदया,
नव्या जिण्याच्या गोष्टी सांगुन शान्तवि त्याला सदया.
विरङ्गुळा द्यायास जिवाला केव्हा प्रीतिभरानें,
बोलत बैसे मुरार तिजशीं निर्मळ एकदिलाने.
मात्र विचारी कधी मुलांची जेव्हा हालहवाल,
घट्ट करूनी मन ती साङ्गे– 'हैतीं समृद्धि खुशाल !'
आणि बाजुला जाउन अपुलीं करुण आसवें ढाळी,
आणि बोलतां कधीं तयाशीं विषय तेवढा टाळी !
हेतु मनीं की पतिस पडावा त्याने पूर्णाराम,
आणि न खातां हाय, निरामय निज गांठावें ग्राम.
परि तद्हृदयीं वात्सल्याला उधाण जेव्हा आलें,
मन संयमुनी, कल्पित लीला कथुन तिने शान्तविलें.
दुर्दैवाची लीला भरतें कधी कधी तिज आणी,
आणि बाजुला जाउन गाळी डोळयांतुन ती पाणी !
मुरारजीने कधी पुसावें–'डोळं कां सगु लाल !'
तोंच साङ्गती कपोलकल्पित गोष्ट हासरे गाल.

परि सगुणेच्या जिवास नाहीं कधि द्यायाचा त्रास,
या सुविचारें मुरारजीनें संयमिलेंच जिवास.
प्रफुल्ल पाहुन प्रीतिरसाने भरलेल्या मुखकमला,
जीवनगुञ्जारवीं तयाचा भृङ्ग यापरी रमला.
कौतुक वाटे रुग्णालयिंच्या परसुखरत देवींना,
शिलोजिच्या नवमधुर स्वप्नें दिसलीं मग नयनांना.
उतार पडतां मुरार साङ्गे सगुला सर्व कहाणी,
हृदय द्रवलें तिचें, सांठलें त्याच्या नयनीं पाणी.
भरांत येऊन साङ्गत असतां जेव्हा गहिवर दाटे,
सगुणा खाली बघुन आसवें गाळी डोळ्यांवाटे.
पडला होता खाटेवरती असाच एके रातीं,
बसली होती सगुणा चेपित पाय तयाचे हातीं;
पेङ्गत, होते श्रवत शिलोजी त्याची करुण कहाणी,
साङ्गूं लागे तों अभिमानें मुरा विधीची करणी—
'सगुने ! माजं चितर पगितलस् समदं आजवरी तूं,
कथा जिवाची तुला साङ्गतों पन् नुरवाय। किन्तू.
सगू, उदळला पैका ! पापं सम्दीं मागं केलीं,
पन् परनारीवर्ती न्हाई नदर कदी ह्यी गेली !
पितं जिवाची तूच येकली तुज्या जिवाची आन,
तुला बुडवली म्हनूनश्येनी तळमळतो ह्यो प्रान.
सगू, अस्तुरी तूच जिवाची, तूच जिवाची देवी,
म्हनून् वांचलों, जोड लाभली लइ भाग्याची दैवीं.
आई म्हन्ली खरं खरं त्यें सगू जिवाला वाटे,
तू दैवाची—!' तोंच लोचनीं पुनरपि पाणी दाटे !

परन्तु धरुनी नव आशा, तो उत्साहाने बोले,
'पूस पूस त्ये सगू अदूगर डोळे अपुले वोले.
नग रहानं हतं, नरक ह्यो, किडे मानसं त्यैंत,
नग नग ही मुमई, जाऊं परतुन अम्भेरींत.
मानाजी पग् थोर! मोडुनी शिपत् हासलों त्येला,
चूकच झाली! कोप तरी ह्यो देवाजीनं केला.
परतुन जाऊं, अम्भेरीच्या राबूं रानामन्दीं,
गरीबींत मङ्ग करुं दैवाची अपुल्या तेजीमन्दी.
भाकर खाऊं गरीबींतली घेउन पोरं सङ्गं,
आम्बराइच्या रानीं राबूं, काय कमी मङ्ग सांग?
डोळां पानी कां म्हुन् आता? पूस पूस त्यें बाई,
राबायाला आपुल्या रानीं कमीपना ह्यो न्हाई!
आम्बराइचं मालक कोणी असतिल त्यांना सेवूं,
टाकुन मागं पैका, अपुली राई कदितरि घेवूं.
पर्गीतल्यापुन, नरकाचं ह्यें रूपच, सगुने, मुमई,—
अपमानाचं जिणं मनाला ततलं वाटत न्हाई.
खातिल पोरंबाळं तुकडा आन रानचा वारा,
भरती येइल खरी खरी ग सगुने, मङ्ग सौंसारा.
घेउनश्यानी अम्बेराई, छत्री मानाजीची-
बान्धुन, पुजूं रोज; व्हइल ग किर्पा देवाजीची.
सगू, वाटलं 'मरन्', तवा ह्ये व्होतं साङ्गायाचं,
रडगानं ह्यें अता कशाला? आता दिसं भाग्याचं!'
भावी सुन्दर या स्वप्नाने सगुचें मन आसावें,
नेत्र चमकले आणि हासली ती प्रीतीच्या भावें.

त्या भावाचें अमृत पिउनी पडला तोही शान्त,
वारा बाहिर गीत गाउनी रमला त्यांत नितान्त.

सगुची सेवा फळास आली, कृपा विधीने केली,
रुग्णालयिंचा वास सम्पला, वेळ जायची आली.
मुरास आता आली होती फिरावयाची शक्ति,
काय न देइल मिळवुन जीवा सत्प्रेमाची भक्ति ?
एक दिनीं मग करुन तयारी तीं गांवास निघालीं,
कृतज्ञतेने निरोप घेतां करुण आंसवें गळलीं.
प्रवासजीवन केलें सगुने निजसेवेने गोड,
गहिवरुनी तो मनीं वदे—'ही लइ भाग्याची जोड !'
एकदोनदा वदला तो मग—'सगू, जरा पड आता !
घे इस्रान्ती; थकलिस भारी !'—'नग !' वदे परि कान्ता.
वदे एकदा—'प्रवास जाला सङ्गं सुखकर भारी,
आता सङ्गं असंच जाऊं आपुन या सौसारीं !'
सगुणा हसली आणि मिटूनी डोळे, विनवी देवा;
मुरास पाहे डोळेभर मग; कुणा न वाटे हेवा ?
यापरि बोलत बोलत गोष्टी संसाराच्या गोड,
रहिमतपुरच्या थाम्ब्यावर तीं आली लागुन ओढ.
पहाट खुलली पूर्वाकाशीं अम्भेरीच्या मागे,
'अजिंक्यतारा' इकडुन पाहे न्याहाळुन अनुरागें.
सुखकर वाहे वडालिम्बांतुन नववासन्तिक वारा,
गवती शुष्क प्रदेश डोले माळावरला सारा.
काळीं रानें नवतेजाने तकाकलीं भवताली,
पडल्या झडल्या कुणीं बान्धल्या रानीं आता ताली.

नाङ्गरलेली पडलीं होतीं रानीं डिखळें काळीं,
कुठे चमकलीं त्यावर किरणीं नव, कोळ्यांचीं जाळीं.
पालवले वड, अम्ब्रेमोहर खचुन दाटला पानीं,
स्वैर भराऱ्न रमले पोपट शब्दीं, कोयळ गानीं.
बूच–लिम्ब–वड--पिम्पर्णीतुन वळण घेउनी वाट–
चढणीवरती सरली, दावुन सर्पाकृतिचा घाट.
भोवतालचे ताम्बुस निळसर डोङ्गर दूरावरुनी,
प्रफुल्लतेने पाहत होते माना उन्च करूनी.
आनन्दाने मुरार उतरे प्रसन्नतेने खाली,
मायभूमिची माती घेउन लावि अगोदर भालीं !
खिलारजोडी जोडुन कोणी तयार गाडी ठेवी,
शिलोजिच्या या योजकतेची स्तुती करावी केवी ?
मुरा-शिलोजी-सगुणा बसलीं, बसला गाडीवान,
घुङ्गुर वाजे खुळखुळ; त्याने भरे वेळुंचें रान !

एकाएकी परी सगूच्या कालव होई पोटीं,
करुण विचारीं हृदयीं झाली कांही खळबळ मोठी !
भावि सुखाच्या स्वप्नीं रङ्गुन बोले तोंच मुरारी–
‘ पगंत असतिल् वाट, न्हाइ का सगुने पोरं दारीं ? ’
उत्तर कसलें–तों हम्बरडा हृदय फोडुनि आला !
काय कथावें कैसा जाळी पुत्रशोक हृदयाला ?
शोकावेगें खान्द्यावर ती टाकुन त्याच्या मान–
स्फुन्दस्फुन्दुनी रडली ! गेला मुरार भाम्बावून !
शिलोजिंनी मग कथिलें सारें, ओसरल्यावर पूर,
दुःखावेगें मनांत उठलें मुरारच्या काहूर !

' करन्यासाठीं बरं मला, तूं दूख झाकलंस् घोर !
सगुने...! ' बोलुन इतुकें स्फुन्दे तोहि; नावरे जोर. २१२०
शिलोजिंनी मग सान्त्वन केलें धरुनी त्यांना पोटीं,
निजासवांनी न्हाणुन वदले शब्द प्रेमळ ओठीं.
तोंच थाम्बले बैल प्यावया कमण्डलूचें पाणी,
' नवं जिणं हें ! '–कमण्डलूची बोले स्वागत-वाणी. २१२४

* * *

## बहार १४ वा

# नवें जिणें

ध्वनि गाडीचा पडतां हिरुच्या आतुरलेल्या कानीं,
धावुन त्याने मिठी मारिली सगुला दोहातांनी.
चुम्बुन त्याला, तिने दाविलें कराङ्गुलीने कांही.
तोंच मुराला हिरू लाजुनी, हासत खाली पाही !
मान फिरविली; परि तो हासत जाई त्याच्याजवळी,
चुम्बुन त्याला, मुरार वत्सल निजहृदयाशीं कवळी.
गहिंवर येउन जरी दाटले नयनीं अश्रू वेगें,
तरी मुराने संयमिलें मन निजवात्सल्यावेगें.
गुल्गुल गोष्टी हिरू मुराशीं बोलाया तों लागे,
आणि साभिनय विक्रम अपुले सर्व पित्याला साङ्गे.
येतिल असले दिवस पुन्हा, हें सगुस वाटलें नाही,
म्हणुन कौतुकें दृश्य मनोरम हें ती पाहत राही !

येऊन आता मुरारजीला दिवस लोटले आठ,
वदनीं त्याच्या तेज आपुलें वठवी कृष्णाकांठ.
कमण्डलूचा गोड निरोगी नवा लागतां वारा,
पुलकित झाला देह तयाचा नव आनन्दें सारा.
नवशक्तीच्या पोटीं धरिला नवाङ्कुराने जोम,
मुरार निन्दी शहररहाणी आणि तियेचें स्तोम.
हृदयीं झाला अधिक प्रेमळ; परी जयांनी त्याला—
वागविलें अधमत्वें त्यांना जाइ न भेटायाला.

ज्या विभवाने अम्भेरीमधि केला होता वास,
त्याच वैभवें परतुन जाया त्याने धरिली आस.
प्रेमळ घरचीं सर्व माणसें आणिक अम्बेराई,
याविण कांही श्रमी जिवाला आवडलें मग नाही.
मूल न पोटीं, म्हणुन शिलोजी आणि तयाची कान्ता–
पुरीं लोभलीं त्यांच्यावरती, लागुन वेडी ममता !

गप्पा-गोष्टी करित अङ्गणीं अशी एकदा सारीं,
बसलीं होतीं जमुन रात्रिची चन्द्रसुधेमाझारीं.
आम्बराइचें तोंच बोलणें हळुच काढिलें त्याने,
आणि वदे–'हीं बरसातीनं भिजातिल आता रानें !
तजवीजीला नगं म्होरल्या लागाया का होवं ?
गेनबासनी पुसायला पन् आपुन् आता जावं.
आम्बराइवर जीव अडकला आता माझा सर्वे,
शिपत मोडली ! काम न हातीं दुसरं कसलं धर्वे.'
तोंच शिलोजी सरकुन पुढती हासत त्याला बोले,
'मुरा, उताइळ होवूं नगं, ह्ये हैती तकडं डोळे.
पोरापुन् तू भारी मज्‌ला, सगू बि माजी पोर,
आला हकडं, मैतर माजा गेला म्हनुनी थोर !
मानाजीची किरत् वदावी कुनीं ! किती ती मोठी !'
डोळे पुसले शिलोजिंनी मग, कालव होता पोटीं !
'शबूद गेला माजा ! माज्या धर्मासाठीं सारं—
आजवरी ह्यें केलं ! न्हाई गेलों कोना हार.
आम्बराइ मी तुला अता ही मिळवुन बक्षिस देतों.'
'नगं, करा ही किरपा मजवर !'–मुरार बोले हें तों.

‘ किरपा केली लइ लइ मजवर मानाजींनी मागं,
आन बोलल, तवा किती मीं धरला त्येंचा राग !
पन् त्यें झालं खरं ! नशिब् ह्यें फुटलं माज्या हातीं !
ऐती मिळकत मङ्जे, काका, अता वाटते माती !
खपूनश्येनीं रानीं, गाळुन मी निडळाचा घाम,
शेतामन्दी राबुन म्होरं करिन पगा आराम.
सगुना माजी येइल सङ्गं; टाकुन मागं पैका,
आम्बराइच्या रिणांतनं मी सुटन; एवडं ऐका !’
‘मुरा तुला पन् ही ध्यायाला हर्कत कसली बोल,
परका मज् तू कादिबी न्हाइस; पिर्ती माजी खोल’.
‘समूदं खरं ह्यें पन् ही ऐती मिळकत काका दोड,
इचार भलतं येउन आन बि लागत न्हाई गोड !
कुनी भरोसा द्यावा फुडला; नियत कुनीं साङ्गावी,
अता वाटतं गरीबिची म्यां पिर्ती येक धरावी !’
‘ पन ह्यो माजा तुला—सगूला देतों खाऊ म्हनुनी.
बसुन सुखानं खा कायमचा वडलांचा ह्यो गनुनी.’
‘ नगं नगं ही किरपा मजवर करा याफुडं, काका,
पिर्तीवर्ती ओतिल माज्या विख दुसऱ्याचा पैका !’
परोपरींनी साङ्गितलें पण ऐकेनाच मुरार,
निश्चय पाहुनि समाधानले मनीं शिलोजी फार.
गोष्ट मनांतिल गुपित आपुल्या, साङ्गायाला वेळ-
हीच पाहुनि योग्य, बोलले काय खेळला खेळ.
‘मुरा ऐक तर, आम्बेराई न्हाइ कुणाची आता,
न्हाइ गेनबा मालक; हाये धनी तियेचा सवता.’

'कोन पगू त्यो साङ्ग बर ? त्यो कोन सगू तू साङ्ग !'
विस्मित सारे पाहुं लागले काहि न लागुन थाङ्ग !
तोंच हासुनी गोड, शिलोजी वदले हलवुन मान—
'हिरु आपला मालक तीचा !—भगवन्ताचं देनं !
कसा जाह्‌ला मालक त्यो बी नगं इचारूं कांही,
अम्बेराई ही पोरांनो परक्याची मुळि न्हाई !'
स्तिमित जाह्‌ले किती वेळ तों सगुणा आणि मुरारी,
भिजलीं नेत्रें पाहुनि लीला दैवाची ही सारी !

आकाशांतुन वर्षत होतें सुखद चान्दणें भंवती,
प्रतिवस्तूला चराचरांतिल आली होती नवती.
झुळझुळ वारा वाहुन आता जरा गारठा आला,
निजले प्राणी, डोङ्गर, झाडें; शान्ति मिळे सर्वाला।
मात्र विचारीं नवीन कांही मुरार झाला गुङ्ग,
पुष्पावरती एकच गानीं रमला जणुं कीं भृङ्ग.
'चला निजूं ! लइ वाडुळ बसलों ! चान्द किती वर आला!'
वदतां काका, उठुनी सगळे गेले झोपायाला.
परि येईना झोप मुराला; मागिल काळ समोर—
दिसुन, शहारुन अङ्ग जाउनी भीति वाटली घोर !
उपकारांचें जड हें ओझें जीवा वाटुनि फार,
कृतज्ञता-आश्चर्य भीतिंनी होय मनीं बेजार !
सगुस वदे मग : 'ही दैवाची करनी उलटी न्यारी,
कोन कुणाचा कसा रिणी पग् दैवाच्या बाजारीं.
कसं करावं, उपकारांचं जोखड जालं भारी !
चौबाजूंनी पुरता गेलों उपकाराच्या हारीं;

आपुन सारं येक, खरं ह्यें; तरि पन् खपुनी रानीं,
पैसं फेडूं समूद हिरूचं निडळाच्या घामांनी !'
हुकार त्याला दिला सगूने, तोहि जाह्ला शान्त,
शान्तिरूपिणी सृष्टी रमली ध्यानीं पूर्ण निवान्त ! २२२•

कळे पुढे की शिलुकाकांनी पुञ्जी वेचुन सगळी
आम्बेराई, आपुलकीने केवळ, केली अपुली.
आणि सर्व हें मानाजीच्या मैत्रीसाठी केलें,
वचन पाळिलें पूर्णत्वाने मानाजीस दिलेलें !
तेव्हा आला मुरारजीचा प्रेमें भरुनी ऊर,
आणि तयाच्या नयनीं वाहे कृतज्ञतेचा पूर.
' अशीं मानसं मला लाभलीं, ही दैवाची खैर !'
बोलुन इतुकें सर्व विसरला तो दैवाशीं वैर.

चार घरांचीं चार माणसें झालीं प्रेमें एक,
परस्परां सुख द्याया करिती स्वार्थत्याग अनेक. २२३•
आपुलकीच्या घरीं नांदते प्रेमें निर्मळ शान्ती,
सुख पाहुन हें शिलुकाकांच्या समाधान हो स्वान्तीं.
पाहुन आग्रह पुढे मुराचा, वेळू सोडुन तेही—
रहावयाला प्रेमें गेले आम्बराईच्या गेहीं.
जीवन झालें सुरू तेथलें निर्मळ आनन्दाचें,
उल्हासाचें मुरा घालवी जीवन शेतकऱ्याचें.
' वनवासाचीं चौदा वर्सं सरलीं आता बैस !
रामराज्य कर हतं ! ' बोलले शिलुकाकाहि मुरास.

गेलीं वर्षें दोन; मुराने पिकें काढिलीं छान,
स्वयें खपूनी मग रङ्गाला सर्व आणिलें रान.

पहिला पैका आला, सारी विकल्यावरती खोती,
मुरास वाटे तेव्हा, पडले हातीं माणिकमोतीं.
सांठवुनी ते आणि घालुनी करुण आसवें त्यांत,
मानाजीची छत्री त्याने बान्धविली शेतांत.
रोज सकाळीं सायङ्काळीं जातां येतां तीचें–
दर्शन घेउन काम चालवी मुरार मग शेतीचें.
केव्हा तरि काढून शिलोजी दिवसामाजी वेळ,
बसती तेथें, हिरूसङ्गतीं खेळत कांही खेळ !
आणि सगूच्या हूर्हुर हृदयीं जेव्हा स्मृतिंनी दाटे
जाउन बैसे ती ही, गाळित अश्रू डोळ्यांवाटे !

थण्डी जाऊन, आता ऊष्मा वाढूं लागे थोडा,
शिशिरामधला खळखळणारा बारिक झाला ओढा.
परि थण्डींतिल चराचराची लोपुन भीषण छाया,
पानोपानीं मोहक विलसे नव वासन्तिक माया.
कुठे कोवळे पल्लव फुटले, कोठे मोहर आला,
वाऱ्यामधुनी सुगन्ध लागे रानीं दरवळण्याला.
सुन्दर मञ्जुळ पक्षिरवांनी भरली अम्बेराई,
तींत कुहूचें कोकिळ गायनताररवाने गाई.
पिकें काढुनी शेतकऱ्यांनी रानीं रचुन बुचाडें,
खळीं घातलीं धान्य मळाया मोगण आणिक माडें.

पाणथळांतुन अजुन उसाचीं होतीं परि जित्रापें,
हिरवट पानें पिवळीं झालीं मात्र उन्हाच्या तापें.
चालू झालीं कुठे गुऱ्हाळें, अगाप कोठे सरलीं,
वैपुल्याच्या आनन्दाने राई-रानें भरलीं.
मोडुन आता मानाजीचें छप्पर पाचटलेलें,
कौलारू घर चौसोप्याचें नवें मुराने केलें.
बाजुस एका बैल बान्धले आणि वांसरें-गाई,
रानवैभवीं खुलूं लागली त्याची अम्बेराई.
दुसऱ्या बाजुस सेवक त्याचा राहे कुणि केदारी,
पत्नी त्याची होय मञ्जुळा सगुची मैत्रिण भारी.
उठुन पहाटे शिलुकाकांनी नित्य अभङ्ग म्हणावे,
गोड सुरावर कधि मञ्जूने जात्यावरती गावें.
सगुणा उठुनी, गुराखालचें काढुनि, कामें पाही.
मुरार घेउन केदारीला कामावरती जाई;
पैरण साधी, खादीधोतर शोभति त्याला फार,
डौल मागला गेला तरि ही वदनीं कान्ति अपार.
कधी न्यहारी खाउन जाई, कधि तो परतुन येई,
केव्हा जेवण त्याचें सगुणा शेतावरती नेई.

आज कराया गुऱ्हाळघर तो आणि ऊस पाजाया,
गेला रानीं दूर गड्यांसह, जाय हिरू हि पाहाया.
टळली वेळा न्याहारीची, आटपुनी तरि काम,
सगू शिदोरी घेउनि लगबग निघे सोडुनी धाम.
सोबतिला घेऊन मञ्जुळा चालूं लागे वाट,
अपूर्व विलसे मधुर भोवती नव वासन्तिक थाट.

वाट सरावी झरझर म्हणुनी उत्सुकुनी स्वमनांत,
मञ्जुळेस तों सगुणा बोले हासुन हलुच पहात,—
‘ गानं म्हन् त्यें तुजं मञ्जुळे ! म्हन् त्यें बाई गोड,
वकूत् न्यारिचा–बिगी बिगी–त्यें ! जिवा लागली वोढ !’
लाजे अपुल्याशींच मञ्जुळा; सगुला परि आतुर–
पाहुनिया, ती काढी अपुले गोड रानटी सूर-

### ५ न्यहारीचें गाणें

“न्यारिचा वकुत होईल    मैतरणी बिगिबिगि चाल !
नाङ्गूरसुटीच्या आंत    पोचाया होवं ततं.
सोडितिल हात बैलाला    धुण्डील नदर कोनाला !
नदरे न पडन् मी जरी,
जाईल मर्जि ग तरी,
उरिं रुतंल माज्या सुरी,
नग नगं गमावूं येळ    मैतरणी बिगिबिगि चाल ! १

लइ वाडुळ जुपि झाल्याली    असत्याल समूर्दि शिणल्यालीं !
शिण जाइल न्यारि करून    अन् साङ्ग कुना देखुन ?
त्यें खुलें त्वाण्ड घामानं    भरघोस हि कण्साहुन.
पाहिलं जरी रोज मीं,
तरि हौस न होई कमी,
फिरफिरुन पगायास मी,
व्होतसे मनिं उतायीळ    मैतरणी बिगिबिगी चाल !” २

अचल पापण्या, डोळे सुस्थिर, टपोर, पाणीदार,
आणि गाल यांवरी पसरली हसरी जादु अपार !

ऐकत होती सुस्वर गाणें सगुणा मन लावून,
अन्तीं नजरा मिळतां, हसल्या दोघी लव लाजून.
गाणें सरतां शान्ति दुणावे भरुनी रानीं सूर,
आणि सगूच्या हृदया लागे गोड पुन्हा हुर्हूर.
'भरघोसहि कण्साहुन'—ऐसें वदनीं घोळत कांही,
मैत्रिणीस ती वदे 'मञ्जुळे, त्रिगिबिगि चल् बाई!'
हसे मञ्जुळा डोळे मोडुन आणि सगू ही लाजे,
खुलले लोचन सगुचे, निर्मळ अनुरागाच्या साजें.
तों बैलाला ताररवानें कुणिं म्हटलेलें गाणें,
ऐकुन, थबकुन, मन्द पावलीं चाले ती अभिमानें.
दृष्टभेट तों होउन दोघें मनीं आपुल्या धालीं,
घाम मुराच्या कितितरि होता डवडवलेला भालीं!
डोक्यावरती ऊन चाललें होतें तावत फार,
अर्ध्या धावेवरती होती मात्र सावली गार.
मोट सोडली आणि दाविलें गुरांस त्यानें पाणी,
केदारीला येण्याला दे हाक तयाची वाणी.
जमले सारे धावेवर ते बसले अम्ब्याखालीं,
तोंच शिदोरी सोडायाला सगुणा पुढती आली.
हिरू बैसला साङ्गाती मग, मुरार पुरवी कोड,
प्रीतिकराची चटणीभाकर लागे न कुणा गोड?
मग आवडतें गाणें तिजला म्हणावया तो साङ्गे,
लाजत हासत नकार देई तीही लाडिक रागें.
परन्तु केला आग्रह त्यानें आणि मञ्जुनें फार,
तेव्हा गाई सगू, माधुरी भरली जींत अपार—

## प्रीतीचें गाणें

पिरतिची किर ऽऽऽ त् सम्द्याहुनी लइ न्यारी ॥धृ०॥
ही पिरंत जडलि रामाला,
शीतेसाटी येडा पर्भु जाला,
मग पुसे झाडांपाखरांला--
'कुनि दावा पिरत् माजि प्यारी' १

हिनं झपाटलं दुर्पदीला,
भावासाटी जिव तळ्मळ्ला,
बोट कापतां र्ये बान्धायाला--
भन् पैठन फाडि जरतारी ! २

हिचं लागीर जनिला झालं !
हिनं नाम्याला येडं केलं !
हिनं तुक्याचं मन भारलं !
या येडांत रमलीं नरनारी ! ३

अशि झळम्बि कितिकां बिज्ली,
कितिकांची जीवजोत इझ्ली,
परि ज्यावर मती हिचि रिझ्ली--
त्यानं साधील्या मुक्ती चारी ! ४

घास तोण्डचा तोण्डीं राहे आणि हातचा हातीं,
लव हि न लवलीं अचल मुराचीं दोडोळ्यांचीं पातीं.

मोहनमन्त्रे भारुन गेला तो प्रीतीच्या गानीं,
गालें त्याचीं रमलीं केवळ सौन्दर्याच्या पानीं. २३२०

हिरू एकदा मुराकडे, मग सगूकडे हलु पाहे,
घटियन्त्राचा लम्बक अथवा जणुं आन्दोलत राहे.
इर्वेतुनी मग गानरसाचे वाहत गेले पूर,
पीक उसाचें आनन्दाने डोलुनि झालें चूर.
सङ्गीताचे सूर उमटले मुरारच्या हृदयांत,
अम्बेराईतून मिळाली सुरेल त्याला साथ.
आणि कमण्डलु शेजारूनी वाहुन झुळझुळवाणें,
ऐकवि मङ्गल गोड आपुलें प्रीतिशान्तिचें गाणें ! २३२८

* * *

# परिशिष्ट

## टीपा

### वेळू व अंभेरी

उत्तर सातारा जिल्ह्यांतील कोरेगांव तालुक्यांत रहिमतपूर या नांवाचें एक कसबे गांव आहे. या गांवाचे अनुक्रमें पूर्वेस व ईशान्येस ' वेळू ' ( येळीव ) व ' अंभेरी ' हीं खेडीं आहेत. या दोन गांवाचे शेजारीं एक मोठी ' आम्बराई ' आहे ही. आम्बराई वेळू आणि अंभेरी या गांवाच्या शिवेच्या ओढ्याकांठीं म्हणजे कमण्डलूच्या कांठीं आहे, अशी कथानकाच्या सोयीसाठीं कल्पना केलेली आहे.

### कमण्डल

वरील रहिमतपूर गांवचा जो मुख्य ओढा त्याचें हें नांव आहे. हा ओढा म्हणजे एक लहानशी पण बारा महिने वाहणारी नदीच आहे. रहिमतपुराजवळील अंभेरीच्या डोंगरांत एक कार्तिक स्वामीचें स्थान आहे. या ठिकाणीं दरसाल मोठी यात्रा भरते. प्राचीन काळीं या ठिकाणीं रहात असलेल्या कार्तिकस्वामींचा कमंडलू एक दिवस उलंडला व त्याची नदी झाली; अशी या नदीची जन्मकथा व त्यावरून तिला ' कमंडलू ' हें नांव मिळालें अशी आख्यायिका आहे. ही नदी ईशान्येकडून वाहत येऊन रहिमतपूर गांवाला दक्षिण अंगाने वळसा घालून पुढें कृष्णेला मिळते. रहिमतपूर गांवीं दुसऱ्या म्हणजे उत्तर अंगानें वळसा घालून आलेला ' कापूर ओढा ' तिला गांवाबाहेर पश्चिम अंगास मिळतो. या संगमामुळें रहिमतपूर हें एकाद्या द्वीपकल्पासारखें झालें आहे.

या काव्यांत प्रत्येक बहाराच्या शेवटीं कमंडलूचा उल्लेख आलेला आहे. तो चित्रित करतांना नायक नायिका यांच्या जीवनांत काय चाललें होतें व 'कमंडलूच्या' जीवनांत कोणकोणते संवादी वा विसंवादी भावस्वर उसळत होते, हें दाखविण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला आहे. या दृष्टीने त्या त्या घटना--प्रसंगांतील भाव व कमंडलूची वृत्ति तुळून पाहाण्यासारखी आहे.

काळवटीचीं रानें =काळ्या मातीच्या जमिनी.

मधल्या डोंगरखोऱ्यांतून = रहिमतपूरच्या पूर्वेला परंतु जरा ईशान्येस झुकलेल्या डोंगरामध्ये दोन बाजूला दोन उंच डोंगर असून मधला डोंगर लहान आहे.त्याच्या खोऱ्यांतून कमंडलु वाहतो.

मराठमोळा लतिकावेली = मराठमोळा वातावरण निर्माण करण्या-साठीं लतिकावेलीला हें विशेषण लावलेलें आहे.

होन = सोन्याचे नाणें ( सोन्याचा तुकडा असा गर्भितार्थ. )

बहिऱ्या ! बहिऱ्या ! = शेताची राखण करतांना पांखरें घालवून देण्यासाठी शेतकरी गोफण मारीत शब्द उच्चारतात ते.

'तिनं व्हायला पुनीत आम्हीं'= यांत भावी काळांतील अनेक सूचना आहेत. सगुणेबरोबर देणगी म्हणून आंबराई मिळेल हीहि यांत गर्भित कल्पना आहे. शिवाय जीवनांत कधीकाळीं वाईट प्रसंग आला तर ही आंबराईच वाचवील, पापापासून शुद्ध म्हणजे ' पुनीत ' करील हीहि सूचना आहे.

साखरपान=लग्न नक्की झालें हें दाखविणारा मराठा समाजांतील एक मंगल विधि ( वाङ्निश्चय )

चोळीबांगडी=सौभाग्यदान म्हणून कांही शेतमळे देण्याची मराठा समाजांत पद्धत आहे व तिला ' चोळीबांगडी ' हें सुंदर नांव आहे. हा शब्द दस्तऐवजांतून वरचेवर येतो.

वेळ अमोशा=वेळ अमावास्या. रहिमतपूर जवळील ब्रह्मपुरी या कृष्ण कांठच्या देवस्थानच्या जत्रेचा दिवस.

आर=हुरडा भाजण्यासाठीं काळ्या जमिनींत वाटोळा उथळ खळगा करून त्यांत रानशेणीचा पेटविलेला विस्तव (अंगार).

गोड प्रतिकार=हें एकनाथ महाराजांचें पद आहे.

शिपणें=रंगपंचमी.

देव देव करणें=सातारा जिल्ह्यांतील मराठे लोक आपापल्या कुलदेवतेच्या बाबतींत फार भाविक आहेत. सामान्यत: पालीचा किंवा जेजूरीचा खंडोबा, कोल्हापूरची अंबाबाई किंवा रत्नागिरीकडील कांहीं देवदेवता हीं यांचीं कुल-दैवतें आहेत. उन्हाळा लागण्याच्या सुमारास शेतांतील कामें संपलेलीं असतात. अशा वेळीं जत्रेला जाणें, देवाला जाणें किंवा नवस फेडणें या गोष्टी ते करीत असतात.

बासन बांधणें=लग्नाचें कापडचोपड विकत घेणें.

जरंडा=हें साताऱ्याजवळील एक मारुतीचें देवस्थान असून तें डोंग-रावर आहे.

माहुली, तांदुळवाडी=या गांवीं उन्हाळ्यांत जत्रा भरतात व कुस्त्यांचे फड पडतात. हीं गांवेंहि साताऱ्याजवळच आहेत.

निवेद करणें=नैवेद्य करणें.

बापुरावचा तमाशा=पठ्ठे बापूराव या सातारा जिल्ह्यांतील रेठरें गांवच्या नामवंत शाहीराचा तमाशा. हा पुढें मुंबईला आपले तमाशे करीत असे. आधुनिक शाहीरांतील हा एक सुप्रसिद्ध व प्रतिभाशाली लावणीकार आहे.

ब्येस=चांगलें, छान.

मोहमयी = मुंबईला परस्थ लोकांनीं दिलेलें नांव. ( मुमई )

हेळ = उन्हाळयांत ओढ्यामध्यें उकरून काढलेले किंवा बांधीव काम केलेले हंगामी खोल झरे. हे झरे पावसाळ्यांत मुजतात व परत ते उन्हाळयांत उकरले जातात.

तापसरीची सांथ = ही साथ म्हणजे १९१८ मधे आलेली इन्फ्ल्यूएंझाची प्रचंड साथ होय. ही सर्व महाराष्ट्रभर फैलावली व सर्वत्र घरटीं चार चार पांच पांच माणसें आजारी पडलीं. पुण्यासारख्या शहरीं तर शाळा-इमारतींची त्यावेळीं इस्पितळें करण्यांत आलीं. पुण्यांत साथीनें दररोज पांच सहाशें माणसें मृत्युमुखीं पडत असत; आणि खेडेगांवांत तर औषधपाण्यावांचून अनेक लोक मेले ! औषधासाठीं व पथ्यवस्तूसाठीं लोकांनी आपलीं गुरेंढोरें विकलीं व जिकडे तिकडे कमालीचा हाहाःकार उडाला ! एकाच घरांत लागोपाठ अनेक मृत्यु झाले. या सत्यकथेचा या काव्यांत पार्श्वभूमि म्हणून उपयोग करून घेतला आहे.

मोरासम...खंती = मोर रंगांत आला कीं नाचूं लागतो, व नाचतां नाचतां एकदम अश्रू गाळतो व थांबतो; अशी आख्यायिका आहे.

येरवाळी = लवकर.

एक इसा = वीस वर्षें.

तालेवार = श्रीमंत.

डोरलें = मराठमोळा स्त्रियांच्या गळयांतील एक सोन्याचा जिन्नस.

थांबा = रेल्वे स्टेशन; उतार ( उतारु उतरण्याचें ठिकाण ).

तेथुन खालीं कृष्णासलिलीं = रहिमतपूर स्टेशनाजवळच्या ( सदर्न मराठा रेल्वे ) धामणेर या गांवाला चिकटून कृष्णा नदी

वहाते व तिथें जवळच तिला कमंडलूचा ओढा मिळाला आहे. त्या दृष्टीने ही ओळ वाचावी.

दारूची लावणी = या लावणींत वैभवांत असलेल्या एका तरुण शेतकऱ्याचा दारूपायीं कसा नाश झाला याचें चित्रण आहे.
" वाटे त्याला पोट ! अरेरे···कुठेही सेवा "
ओळी ७३१-३२ व १५२९-३० यांतील पुनरुक्ति सहेतुक आहे. या दोन ओळींतील भाव व्यक्त करतांना प्रसंग कोणते होते. त्यांची तुलना करून पाहा.

परेळ = परेळ भागांतील गिरण-भागांतील हें पूर्वीचें चित्र आहे.
" झुंझुरकाचा उठून कोणी······"
हें मुरारच्या स्वप्नाळु व काव्यात्मवृत्तीचें चित्र आहे.

संव्यथा = सहानुभूति (कै. प्रा. श्री. नी. चापेकरांचा हा शब्द आहे).

जगन्नायकें काय मांडिला खेळ = विनायक कवीची " जगन्नायकें खेळ मांडिला जगत्पटाच्या वरी ! मानव नरदा, दिवस यामिनी फासे धरिले करीं" या ओळी व त्यांतील जीवनाचा दृष्टिकोन प्रसिद्ध आहे.

परसुखरत देवी = रुग्णालयांतील सेविका.

अस्तुरी = स्त्री; गडणी; हा शब्द लावणी वाङ्मयांत ' काव्यात्म स्त्री, प्रियकरीण, प्रिया ' या अर्थीं वापरला जातो.

प्रवास जाला सङ्गं सुखकर भारी = आपला जीवनाचा प्रवास फार सुखाचा झाला.

अजिंक्यतारा = (i) सातारचा किल्ला ' अजिमतारा ' याला जनतेने दिलेलें हें नांव आहे. रहिमतपूरच्या स्टेशनावरून पश्चिमेकडे दृष्टि फेकली कीं निळसर धुक्यांत हा किल्ला दिसतो. ( ii

'अजिंक्यतारा इकडुन पाहे...'या ओळीपासून पुढील आठ दहा ओळींतील वर्णन रहिमतपूर स्टेशनपासून रहिमतपूर गांवास जाणाऱ्या रस्त्याचें व त्याच्या आजूबाजूच्या प्रदेशाचें आहे.

"वनवासाचीं चौदा वर्सं..."=आम्बराईची कथा म्हणजे मुराऱ्या जीवनांतील चौदा वर्षांच्या वनवासाची कथाच आहे. आणि आम्बराईतील बहार हि चौदाच असून नेमक्या चौदाव्या बहाराचे शेवटीं हे शब्द शिलुकाकांच्या तोंडीं आले आहेत, हें पाहाण्यासारखें आहे.

बुचाड = पिकाची कापणी झाल्यावर कणसें असलेल्या ताटांची (अरगड, शाळू, बाजरी वगैरे) शंकूच्या आकाराची शेतांत रचलेली गंज.

मोगण, मार्डे = मोगण म्हणजे मुख्य पिकांत मधून मधून लावलेलें दुय्यम पीक. उदा० शाळूमध्यें लावलेला हरभरा. यांत हरभरा हें 'मोगण' पीक. मार्डे म्हणजे सबंध शेतांत लावलेलें एकच एक पीक. उदा० माडा हरभरा म्हणजे नुसतें एकच एक हरभऱ्याचें पीक.

अगाप पिकें = अगाऊ लावलेलीं, लवकर लावलेलीं पिकें.

'न्यहारीचें गाणें' = हें गाणें राजकवि यशवंत (य. दि. पेंढरकर) यांचें आहे. हें त्या काळीं फार लोकप्रिय झालेलें कुणबाऊ भावगीत होतें. म्हणून ते मंजुळेलाहि येत होतें. अशी कल्पना केलेली आहे.

"प्रीतीचें गाणें उर्फ पिरतिची किरत..." या गीतांत प्रीतीची अत्यंत व्यापक कल्पना मांडलेली आहे. काव्यात्म प्रीति बंधुभगिनीप्रेम

व देवभक्त यांची भक्ति यांची यांत महति गाइलेली आहे; आणि त्याला उदाहरण म्हणून राम--सीता, कृष्ण--द्रौपदी व जनाबाई, नामदेव, तुकाराम यांच्या जीवनांतील प्रसंगांचें व त्यांच्या भावनेचे चित्रण केलें आहे. शेवटीं अशा प्रीतीची ज्यावर बहाल मर्जी झाली त्याला मोक्ष म्हणजे चारी मुक्ति मिळाल्या असें म्हटलें आहे.

चारी मुक्ति =सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता या चार मुक्ति आहेत.

'ही पिरत जडलि रामाला' = सीताहरणानंतर राम सीतेसाठीं वेडा झाला व झाडापांखरांजवळ तिचा शोध करूं लागला हा कथाभाग.

'हिनं झपाटलं दुर्पदीला' = कृष्णाने द्रौपदीच्या भगिनीप्रेमाची कसोटी पाहण्यासाठी स्वतांचें बोट कापून घेतलें व तें रक्तबंबाळ बोट पाहून द्रौपदीने आपल्या बहुमोल पैठणीच्या 'चिंधीने' तें बांधलें हा कथाभाग.

'हिचं लागीर जनिला झालं'= लागीर होणें म्हणजे भुताने झपाटणें. भक्तीच्या भुताने जनाबाई, नामदेव व तुकाराम यांना झपाटलें होतें असा भाव. "भुत जबर मोठं ग बाई। झाली झडपण करूं गत काई, भुत लागलं हें नारदाला" वगैरे ओळींतून आलेला हा संकेत प्रसिद्ध आहे.

प्रीतिशांतिचें गाणें = मुरार व सगुणा यांच्या जीवनांत अथांग प्रीति व अलोट शांति निर्माण झाली हा भाव.

## प्रदीर्घ उपमा (होमेरिक सिमिली)

या काव्यांत दोन ठिकाणीं (बहार १० ओळी १६४७-१६५८ व बहार १२ ओळी १९५५ ते १९६५) प्रदीर्घ उपमा वापरलेल्या आहेत. हिला इंग्रजी वाङ्मयांत 'होमेरिक सिमिली' हें नांव असून मराठींत तिचा उपक्रम त्या वाङ्मयांतूनच झालेला आहे. अशा तऱ्हेच्या प्रदीर्घ उपमा माधव जूलियन यांच्या 'सुधारक' काव्यांतहि आलेल्या आहेत. इंग्रजी वाङ्मयांतील ही प्रथा फार जुनी आहे. एकाद्या प्रसंगांतील रहस्य विशद होण्यासाठी तशाच एकाद्या भावसदृश प्रसंगाचें सविस्तर चित्रण करून त्यांतील साम्य दाखवावयाचें हा यांतील हेतु असतो. मुरारच्या जीवनांतील दोन गंभीर प्रसंगांचें रहस्य कळण्यासाठीच या प्रदीर्घ उपमांचा उपयोग करण्यांत आलेला आहे.

* * *

# आम्ही प्रकाशित केलेल्या कादंबऱ्या

